



विसोबा खेचर-विरचित

# षट्स्थल

संपादक :

रामचंद्र चिंतामण ढेरे

# विसोबा खेचर-विरचित 'षट्स्थल'

## ज्ञानेश्वरकालीन एक अपूर्व ग्रंथ

शोध आणि संपादन

**डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे**





अबोली
प्रकाशन

विसोबा खेचर-विरचित 'षट्स्थल'
डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे

VISOBA KHECHAR- VIRACHIT 'SHATSTHAL'
By Dr. R. C. Dhere

प्रकाशिका :
सौ. उषा पसारकर
अबोली प्रकाशन
'उषास्वप्न', १२६ ब, मार्कंडेय नगर,
सोलापूर ४१३ ००३





प्रथमावृत्ती : सप्टेंबर १९९९
अबोली प्रकाशन क्रमांक ३

संगणकीय अक्षर-जुळणी :
केतकी फोटो टाईप सेटर्स,
सोलापूर ४१३ ००३
☎ (०२१७) ६०२ ३०१

मुखपृष्ठ :
शिरीष घाटे

मुद्रणस्थळ :
चेरी ऑफसेट प्रिंटिग ॲण्ड पॅकेजिंग इं. प्रा. लि.
ए ७५, एम्.आय्.डी.सी., चिंचोळी, सोलापूर

मूल्य : १०० रुपये

मुखपृष्ठावरील चित्र :
'षट्स्थला'तील वर्णनाशी संवादी असे पांचाळ पंचाचार्यांना जन्म देणाऱ्या
पंचमुख शिवाचे रंगीत चित्र.
(भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था, पुणे यांच्या संग्रहातून)

कल्याणीतील
अनुभवमंटपाचे आद्याचार्य
श्रीअल्लमप्रभुदेव
यांच्या चरणकमळांवर
सादर समर्पित

# संपादकीय निवेदन

'विसोबा खेचर-विरचित षट्स्थल' हा अपूर्व ग्रंथ मला १९६९ मध्ये उपलब्ध झाला. या ग्रंथाच्या उपलब्धीमुळे यादवकालीन मराठी वाङ्मयाच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीचे अनेकांगांनी नवे आकलन घडेल, असे मला जाणवल्यामुळे मी या ग्रंथाच्या अंतरंगाच्या आधारे शोधप्रबंध सिद्ध करून, तो पुणे विद्यापीठाकडे पीएच्. डी. पदवीसाठी सादर केला. माझ्या शोधप्रबंधाचे परीक्षक होते पंडितवर बाळाचार्य खुपेरकर आणि डॉ. वि. भि. कोलते. या दोन्ही परीक्षकांनी मुक्तपणे प्रबंधाची प्रशंसा केली आणि १९७५ मध्ये मला पीएच्. डी. पदवी प्राप्त झाली. हा प्रबंध १९७७ च्या प्रारंभी 'चक्रपाणि' या प्रतीकात्मक नावाने पुण्यातील विश्वकर्मा साहित्यालयाने देखण्या स्वरूपात प्रकाशित केला. प्रबंधाच्या या प्रकाशित स्वरूपात 'त्र्यंबकमठिका' हा, ज्ञानदेवांच्या बोधभूमीवर अपूर्व प्रकाश टाकणारा नवा शोधनिबंध समाविष्ट केला होता. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना अत्यंत आवडलेला हा शोधनिबंध प्रथम 'नवभारत' या वैचारिक कालिकात (नोव्हेंबर १९७५) प्रकाशित झाला होता.

त्यानंतर 'चक्रपाणि' हा प्रकाशित प्रबंध माझ्या अन्य तीन पुस्तकांसह ('लज्जागौरी', 'संतसाहित्य आणि लोकसाहित्य' व 'महाराष्ट्राचा देव्हारा' यांसह) मी डी. लिट्. या सर्वोच्च पदवीसाठी सादर केला आणि विशेष म्हणजे तर्कतीर्थ जोशी, भारत सरकारच्या पुरातत्त्व विभागाचे महासंचालक श्री. म. न. देशपांडे आणि डॉ. स. रा. गाडगीळ या विद्वत्त्रयाने एकमुखी अनुकूल निर्णय दिल्यामुळे १९८० च्या मार्चमध्ये मला पुणे विद्यापीठाची डी. लिट्. ही पदवी प्राप्त झाली. 'चक्रपाणि' या ग्रंथाला या उच्च-सर्वोच्च पदव्यांबरोबरच पुणे विद्यापीठ, महाराष्ट्र साहित्य परिषद् आणि महाराष्ट्र शासन यांचे पुरस्कारही लाभले.

माझे परमस्नेही आणि प्रसिद्ध विचारक प्राचार्य नरहर कुरुंदकर यांनी आपल्या प्रदीर्घ प्रस्तावनेत माझ्याविषयी जे म्हटले आहे, ते उद्धृत करणे हे एक प्रकारे आत्मश्लाघेच्या दोषाला पात्र ठरेल; म्हणून ते टाळून त्यांचे केवळ प्रबंधविषयक अभिमत उद्धृत करतो. त्यांनी म्हटले आहे की, "संस्कृतचे गाढे व्यासंगी आणि वैदिक परंपराभिमानी पं. बाळाचार्य खुपेरकर आणि महानुभाव वाङ्मयाचे ज्येष्ठ संशोधक डॉ. कोलते हे दोघे या प्रबंधाचे परीक्षक होते. या उभयतांनाही एवढी प्रचंड उलथापालथ करणारा हा प्रबंध प्रशंसनीय वाटावा, हीच या प्रबंधाची खरी थोरवी आहे... ममत्व बाजूला ठेवले, तरीही शुद्ध पुराव्यावर ढेरे यांनी जे निर्णायक रीत्या सिद्ध केले आहे, त्याची उत्पातक्षमता नाकारता येणे शक्य नाही. समोर आलेला पुरावा खोडून दाखवणे अगर मान्य करणे हे दोनच पर्याय ज्यांच्यासमोर असतात,

त्या सर्व अभ्यासकांना हा प्रबंध नवी दिशा दाखविणारा वाटेल, याची मला खात्री आहे."

अशाच प्रकारे प्रख्यात पुरातत्त्वज्ञ आणि सांस्कृतिक इतिहासाचे जाणकार डॉ. शां. भा. देव यांच्यापासून प्रसिद्ध वाङ्मयसंशोधक डॉ. पंडित आवळीकर यांच्यापर्यंत अनेक नामवंत अभ्यासकांनी 'चक्रपाणि' या ग्रंथाची प्रशंसा केली आहे. 'अज्ञाननिरसन हा पराभव नसून प्रगती आहे', अशी माझी धारणा असल्यामुळे शुद्ध प्रमाणांच्या प्रकाशात मी माझी कालची भ्रांती मान्य करायला आणि स्वतःला दुरुस्त करायला सदैव सिद्ध असतो. परंतु जे 'हेतुतः' दुराराध्य सांप्रदायिकतेचा अनुनय करण्यासाठी पुढे येऊन माझ्यावर हेत्वारोप करतात, माझ्या प्रमाणांचा सामग्र्याने विचार करण्याचे टाळतात आणि वाचकांना चकवणारे सत्यापलाप सतत करीत राहतात, त्यांना कोणीही प्रांजळ सत्यशोधक केव्हाही कोणतीही बाब पटवू शकणार नाही. आपण भवभूति-भर्तृहरीचे स्मरण करावे आणि त्यांना हवी असलेली 'विजयपत्रे' देऊन आपल्या क्षेत्रात मग्न रहावे, हेच उचित असते.

'चक्रपाणि' या प्रबंधाला प्रेरक ठरलेला आणि मुख्य आधार बनलेला 'विसोबा खेचर-विरचित षट्स्थल' हा ग्रंथ प्रबंधाच्या टंकित रूपात समाविष्ट केलेला असला आणि पुणे विद्यापीठाच्या जयकर ग्रंथालयात अभ्यासकांना तो उपलब्ध असला तरी 'चक्रपाणि' या मुद्रित प्रबंधात त्याचा समावेश करणे पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे त्यावेळी शक्य झाले नव्हते. पुढे १९८९ च्या दिवाळीत 'श्रीगुरुमाऊली' या विशेषांकात 'नाथसंप्रदायाचा इतिहास' (पुणे, १९५९) या माझ्या पहिल्या शोधग्रंथाचे मी जसे पुनर्मुद्रण केले, तसेच नाथसंप्रदायविषयक माझे अन्य संशोधनही त्याबरोबर समाविष्ट केले होते. या अन्य संशोधनात 'षट्स्थला'ची संपादित संहिता समाविष्ट झालेली होती. आता दहा वर्षांनंतर माझे तरुण स्नेही डॉ. शे. दे. पसारकर यांच्या इच्छेचे फळ म्हणून 'षट्स्थला'चे संपादन स्वतंत्र पुस्तकाच्या रूपात प्रकाशित होत आहे. डॉ. पसारकर हे प्रामुख्याने वीरशैव मराठी वाङ्मयाचे साक्षेपी संशोधक-संपादक म्हणून प्रसिद्ध असले, आणि त्या महान् परंपरेतील सर्व सत्त्वांशांचा त्यांना सहज-स्वाभाविक अभिमान असला, तरी त्यांची वृत्ती-प्रवृत्ती संकुचित सांप्रदायिकतेत अडकून पडणारी नाही. शुद्ध वस्तुनिष्ठ शोधदृष्टीला 'दिसलेल्या' तथ्या-सत्यांना प्रसन्नपणे सामोरे जाण्याची स्वागतशीलता त्यांच्या ठायी आहे. गेल्या तीन दशकांच्या स्नेह-सहवासात त्यांचा हा विशेष मी जवळून अनुभवला आहे. त्याचमुळे, वीरशैव मराठी वाङ्मयाच्या समृद्ध परंपरेतील हा आद्यग्रंथ त्यांच्याद्वारा प्रकाशित होताना मला सानंद समाधान लाभले आहे. मराठी साहित्य आणि संस्कृती यांचे निर्मळ अभ्यासक डॉ. पसारकरांच्या प्रयत्नांची पाठराखण करतील, अशी आशा आहे.

गेली पाच वर्षे शारीरिक अस्वास्थ्यामुळे मी माझ्या अनेक अनावर संकल्पांना मूर्तरूप देऊ शकलो नाही. 'षट्स्थला'चा भाषिक अभ्यास विस्ताराने मांडावा, त्यातील पारिभाषिक

संज्ञांचा उलगडा करण्याचा यथाशक्य प्रयत्न करावा, अपरिचित शब्दांचा कोश सिद्ध करावा, ओवीसूची करावी, प्रस्तावना 'चक्रपाणि' या ग्रंथातून संकलित करून घेण्याऐवजी स्वतंत्र लिहावी, असे सातत्याने वाटत असतानाही मला ते शक्य झाले नाही. जाणकार वाचकांपुढे 'षट्स्थला'ची संहिता काही पूरक-उपकारक सामग्रीसह मी सादर केली आहे. त्यांच्यापैकी एखाद्या निर्मळमनस्क ज्ञानोपासकाने 'न्यून ते पुरते' करून घेतले, तर मला आणि डॉ. पसारकरांना निश्चितच आनंद होईल. द्वितीयावृत्तीचा योग आला आणि मला स्वास्थ्य लाभले, तर मीही हे काम करीन.

'श्रीकृष्णजयंती' रामचंद्र चिंतामण ढेरे
२ सप्टेंबर १९९९

## अनुक्रम

# प्रस्तावना



**'षट्स्थला'ची अपूर्व उपलब्धी :**

आद्य मराठी वाङ्मयाच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीचे अध्ययन करताना, काळाने स्वीकारलेले महामौन काही बाबतीत मोडणारे एक प्रभावी साधन मला काही वर्षांपूर्वी योगायोगाने, अकल्पितपणे उपलब्ध झाले. पुणे येथील संदर्भसामग्रीचे एक प्रसिद्ध विक्रेते श्री. काशिनाथ पांडुरंगशास्त्री पारखी हे दि. ३० ऑगस्ट १९६९ रोजी सकाळीच माझ्याकडे आले आणि 'माझ्याकडे काही हस्तलिखितांचा गळाठा शिल्लक उरलेला आहे; तो तुम्हाला हवा असल्यास जमवून देईन', असे म्हणाले. हस्तलिखितांच्या बाबतीत मी स्वभावतःच हळवा असल्यामुळे, शास्त्रीबुवांच्या समवेत मी लगेच त्यांच्या घरी गेलो. त्यांनी बाजूला काढून ठेवलेली हस्तलिखिते चाळली आणि त्यांतील काही पूर्णापूर्ण स्वरूपातील बाडे व काही अपूर्ण हस्तलिखिते विकत घेऊन घरी आलो.

ही बाडे सवडीने चाळीत असताना त्यांतील एका जीर्ण बाडात 'षट्स्थल' हा अपूर्व ग्रंथ मला आढळला. 'षट्स्थल' हे अश्रुतपूर्व ग्रंथनाम आणि 'खेचर विसा' अशी कर्तृनाममुद्रा पाहिल्यावर माझा आनंद ओसंडून गेला. हस्तलिखितात बहुतांशी टिकून राहिलेले भाषेचे यादवकालीन स्वरूप सहज जाणवणारे असल्यामुळे तर या नव्या उपलब्धीचे महत्त्व मनात ठसून गेले. यादवकालीन सांस्कृतिक इतिहासाच्या क्षेत्रातील अनेक गूढांचा वेध घेण्यासाठी एक समकालीन विश्वासार्ह मातबर साक्षीदारच आपल्यापुढे या हस्तलिखिताच्या स्वरूपात उभा आहे, याची खात्री पटली.

**हस्तलिखिताचे स्वरूप :**

'षट्स्थल' हा ग्रंथ ज्या हस्तलिखितात आहे, ते एक अपूर्ण बाड आहे, हे सांगितलेच आहे. हे बाड आडवे शिवलेले असून, त्याची लांबी ९.४ इंच आणि रुंदी ५.७ इंच आहे. हे बाड जीर्ण झालेले आहे. विशेषतः खालचे दोन्ही कोपरे झिजलेले आहेत. खालच्या डाव्या कोपऱ्याच्या झिजीमुळे प्रत्येक पत्राच्या दोन्ही बाजूंची कोपऱ्यावरील काही अक्षरे नष्ट

झालेली आहेत. उपलब्ध पत्रांपैकी पहिल्या तीन पत्रांचा तर खालचा भाग अर्धा-अर्धा झिजून गेला आहे. बाडावर पाण्याचाही थोडा संस्कार झालेला दिसतो. सर्व लेखन एकहाती असून, ते पत्राच्या दोन्ही बाजूंना लहान समास सोडून केलेले आहे. पत्राच्या दर्शनी पृष्ठावर उजवीकडील समासात पत्रांक टाकलेले आहेत. उपलब्ध पत्रांचे क्रमांक १३ ते ६९ असे आहेत. म्हणजे उपलब्ध पत्रांची संख्या ५७ असून आद्यन्तीची बारा बारा पत्रे नष्ट झालेली आहेत. मूळच्या पूर्ण बाडाची पत्रसंख्या (५७ अधिक २४) म्हणजे ८१ होती, हे उघड आहे. या बाडाच्या उपलब्ध भागात पुढील रचना क्रमाने लिहिलेल्या आहेत :

१. **नामदेवकृत 'श्रीज्ञानेश्वरसमाधिमहिमा'** : अभंग ३० ते ४३.

२. **ज्ञानदेवकृत 'स्तुति' ('नमन'—'नमः कालकौतूहल' इत्यादी)** : ओव्या १०८.

३. **नामदेवकृत 'श्रीज्ञानेश्वरसमाधिमहिमा'** : (पुढे चालू) अभंग ४४ ते ६४.

४. **स्फुट पदपदांतरे** : 'बरवा वो हरी बरवा वो' ( रखुमादेवीवर), 'आड त्रिपुंड्र शोभत' (ज्ञानदेव), 'योगिया दुर्लभ (रखुमादेवीवर), 'जघनावरी कर ठेउनि' (मुकुंददास जोगा).

५. **'पंचीकरणपरिभाषा' : संस्कृत-फारसी** : फक्त ६ ओळी. या एवढ्या किरकोळ रचना पत्रांक १२ ते ३३ (दर्शनी बाजूपर्यंत) यांत समाविष्ट आहेत.

६. **'हरिहरसंवाद'** : संस्कृत रचना. श्लोकसंख्या ४७.

प्रारंभ : 'श्री गणेशाय नमः। श्रीसरस्वतिय नमः। श्रीसचिदानंद गुरुवे नमः। आदीनाथाये नमः।

अंत : 'इति श्रीसैवागमे महायोगशास्त्रे हरिहरसंवादो समाप्त।' ही रचना पत्रांक ३३ ( मागील बाजूपासून) ते ३९ ( मागील बाजूवरील पहिल्या तीन ओळीअखेर) यात समाविष्ट आहे.

७. **ज्ञानदेवांचे अभंग** : अभंगसंख्या ३१. बहुतेक अभंगांत 'रखुमादेवीवर' ही मुद्रा आहे.

८. **ज्ञानदेवकृत 'मदळसा'** : वैराटिका छंदातील २५ कडवी. पत्रांक ४६ च्या मागील बाजूवर या प्रकरणाची अखेरची केवळ एकच ओळ आलेली आहे.

९. **खेचर विसा-कृत 'षट्स्थल'** : पत्रांक ४६ (मागील बाजूपासून) ते पत्रांक ६७. एकूण साडेएकवीस पत्रे.

१०. **'गुरुपरंपरा'** : वैराटिका छंदातील ७७ कडवी उपलब्ध. ७७ व्या कडव्यापुढील सर्व भाग नष्ट. शेवटच्या नष्ट झालेल्या १२ पत्रांत हाच ग्रंथ चालू होता,

की हा संपून आणखी एखादी रचना लिहिलेली होती, ते समजावयास आता मार्ग नाही.

### हस्तलिखिताचा मूलस्रोत :

या महत्त्वपूर्ण हस्तलिखिताचा मूलस्रोत कोणता, ते समजल्यास आपले तत्संबद्ध अध्ययन योग्य दिशेने होऊ शकेल. मला हे हस्तलिखित एखाद्या मठात, मंदिरात अथवा एखाद्या संप्रदायाशी संबद्ध अशा घराण्याच्या संग्रहात मिळाले नसून, दुर्मिळ संदर्भसामग्रीच्या विक्रेत्याकडे मिळाले आहे, हे मी पूर्वी सांगितलेच आहे. श्री. पारखीशास्त्री यांनी अनेक ठिकाणांहून हस्तलिखिते मिळवली आणि ती डेक्कन कॉलेज व पुणे विद्यापीठ या संस्थांना मोठ्या प्रमाणात व थोडी काही व्यक्तींना फुटकळ स्वरूपात विकली. अन्यत्र योजनापूर्वक विकून राहिलेला जो गळाठा होता, त्यातील काही अपूर्ण व विस्कळीत हस्तलिखिते त्यांनी मला विकली. 'षट्स्थला'चा समावेश असलेल्या बाडाचा मूलस्रोत शोधण्याच्या हेतूने मी शास्त्रीबुवांकडे त्यांच्या हस्तलिखितसंकलनाविषयी विचारणा केली असता, त्यांनी अशी माहिती पुरविली की, "मी एखाददुसरे सुटे हस्तलिखित पुण्यातील रद्दीच्या दुकानांतून अधूनमधून मिळवीत राहिलो असलो, तरी प्रामुख्याने सासवड येथील एका पुरंदरे घराण्यातून आणि अकोले (जि. नगर) येथील कवीश्वर घराण्यातून मी मोठ्या प्रमाणात हस्तलिखिते आणली. कवीश्वरांकडील हस्तलिखितांची नोंद लगेच वेगळी केली आणि ती सर्व एकदम पुणे विद्यापीठाला विकली. अर्थातच कवीश्वर संग्रहाशी संबंध नसलेली बहुतेक बाडे मी सासवडहून पुरंदऱ्यांच्या संग्रहातून मिळवलेली होती."

माझा अध्ययनविषय झालेल्या हस्तलिखिताचा मूलस्रोत शोधण्याच्या दृष्टीने मला ही माहिती महत्त्वाची वाटते. सासवड हे सोपानदेवांचे समाधिस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. तेथे आजही सोपानदेवांच्या समाधिमंदिरात समाधीची पूजाअर्चा नित्यनेमाने करणारे गोसावी उपनामक घराणे नांदते आहे. हे घराणे आदिनाथ- मत्स्येंद्रनाथ- गोरक्षनाथ- मुक्ताबाई- चांगदेव इत्यादी परंपरेचे सातत्य राखणारे आहे.[१] या घराण्यात खं. चिं. मेहेंदळे, पां. न. पटवर्धन, गो. का. चांदोरकर या संशोधकांना पूर्वी अनेक महत्त्वपूर्ण कागदपत्रे उपलब्ध झालेली होती.[२] या पार्श्वभूमीवर समाधिमंदिराच्या व्यवस्थेशी संबद्ध असलेल्या, मुक्ताबाईच्या परंपरेतील गोसावी घराण्यातले असण्याचा दृढ संभव जाणवतो.

### हस्तलिखितातील रचनांची प्रकृती :

प्रस्तुत हस्तलिखिताच्या मूलस्रोताविषयी बाह्य साक्षीच्या आधारे आपण जे अनुमान केले आहे, त्याला हस्तलिखितातील रचनांच्या काही समान विशेषांमुळे पुष्टी मिळू शकते

काय, हे पहावयाला हवे. पृष्ठपूरकाप्रमाणे उतरलेली त्रोटक संस्कृत-फारसी 'पंचीकरणपरिभाषा' वगळली, तर उरलेल्या नऊ शीर्षकांखालच्या रचनांपैकी सहा रचना ज्ञानदेवांच्या व ज्ञानदेवांविषयीच्या आहेत; 'षट्स्थल' हा ग्रंथ मुक्ताबाईच्या परंपरेतील विसोबा खेचरांचा आहे; 'गुरुपरंपरा' या त्रुटित ग्रंथाचा कर्ता अज्ञात असला, तरी ग्रंथाचा विषय आदिनाथ-मत्स्येंद्रनाथादी परंपरेचा इतिहास ग्रथित करणारा आहे आणि 'हरिहरसंवाद' हा शिवागमान्तर्गत महायोगशास्त्राचा संस्कृत ग्रंथ आदिनाथाच्या नमनाने सुरू झालेला आहे. म्हणजे या हस्तलिखितातील सर्व रचना ज्ञानदेवांशी या ना त्या प्रकारे संबद्ध आहेत. यातील काही रचना ज्ञानदेवरचित आहेत; काही रचनांचा ज्ञानदेव हा विषय आहे; तर काही रचना ज्ञानदेवांच्या नाथ संप्रदायाशी अथवा नाथ संप्रदायाला प्रिय असलेल्या योगमार्गाशी निगडित आहेत.

हस्तलिखितातील सर्व रचनांचा हा समान अंतरंगविशेष ध्यानी घेता, हे हस्तलिखित ज्ञानदेवांच्या परंपरेतील व्यक्तीने उतरले अथवा उतरविले आहे, हे उघड आहे. सासवड येथील पुरंदरे घराण्यातून आलेल्या या हस्तलिखिताचा संबंध अंतरंगदृष्ट्या सासवडाच्याच सोपानदेव-समाधिमंदिरातील गोसावी घराण्याशी असणे अगदी स्वाभाविक वाटते. विशेषतः प्रस्तुत हस्तलिखितात व्याप्तीने आणि अंतरंगाने सर्वाधिक महत्त्वाचा ठरणारा 'षट्स्थल' हा ग्रंथ रचणाऱ्या विसोबा खेचरांनी आदिनाथ- मत्स्येंद्रनाथ- गोरक्षनाथ- मुक्ताबाई- चांगदेव इत्यादी जी गुरुपरंपरा नोंदविली आहे, त्याच परंपरेतील रामानंद नामक सत्पुरुषाचे घराणे आज सासवड येथील सोपानदेव-समाधिमंदिरात नांदते आहे. शिवकालात शिवप्रभूंचा उदार आश्रय प्राप्त करून, याच रामानंदांनी आळंदी, सासवड, इत्यादी ठिकाणी असलेल्या ज्ञानदेवादी महासाधूंच्या समाधिस्थानांच्या पूजेअर्चेची नीट व्यवस्था लावली.[३]

संभवतः अशा थोर परंपरेशी निगडित असलेल्या घराण्यात उपलब्ध झालेल्या या हस्तलिखितातील 'षट्स्थल' हा ग्रंथ यादवकालीन मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी आकळण्याच्या दृष्टीने किती उपकारक ठरणार आहे, ते निश्चित करण्यासाठी त्याचा स्थूल परिचय करून घेणे अगत्याचे आहे.

**ग्रंथाचे नाव : 'षट्स्थल' :**

या नवोपलब्ध ग्रंथाचे नाव 'षट्स्थल' असे अभिप्रेत आहे. प्रत्यक्ष ग्रंथात या नावाची 'शडूस्छळ', 'शडूस्छळी' अशी रूपे वापरलेली आहेत. ग्रंथारंभी 'शडूस्छळी ग्रंथ' असा ग्रंथनामनिर्देश असून, ग्रंथान्ती 'ईति श्रीशडूस्छळु संपुर्णमस्तु....' असा समाप्तिलेख आहे. पहिल्या 'प्रसंगा'तील मंगलाचरणात ग्रंथसिद्धीसाठी गणेश-शारदेचे आणि वटेश्वराचे स्तवन

करीत असताना ग्रंथकाराने तीन वेळा ग्रंथनाम उल्लेखिले आहे :

*तरी या शडूस्छळा। तुम्ही कृपादृष्टी न्याहाळा।*
*वर्णिन ज्ञाध्वनिळा। वोविप्रबंधे।। २६।।*
*ये शडूस्छळरचने। ग्रंथु प्रबंधु विस्तारणें।*
*तरी तुवां प्रगट होणें। शब्दरचनेसि।। ५३।।*
*ऐसें वटेश्वरुप्रसादें। मन उल्हासलें आनंदें।*
*तें हें शडूस्छळ वोविप्रबंधें। अनुवाद करीन।। १५८।।*

या तीन ठिकाणी 'शडूस्छळ', 'शडूस्छळरचना' असे ग्रंथनाम गोवलेले असून 'वोविप्रबंध' आणि 'ग्रंथप्रबंध' या शब्दांनी आपल्या रचनेचा विशेष नोंदविला आहे. प्रबंध म्हणजे गानयोग्य रचनाबंध. ज्ञानदेवांनी 'माझे श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे' अशी जी आकांक्षा प्रकट केली आहे, तीतही 'प्रबंध' शब्दाचा हाच अर्थ अभिप्रेत आहे. 'वोविप्रबंध' म्हणजे ओवी छंदात केलेली गानयोग्य रचना.

ग्रंथकाराने ग्रंथाच्या अखेरीसही स्पष्टपणे ग्रंथाचे नाव नोंदविले आहे. ग्रंथाची सांगता करताना तो म्हणतो :

*ईति श्रीगुरुशिष्यसंवादु । तो हा शडूस्छळाचा भेदु ।*
*मऱ्हाटी टीका वोविप्रबंधु । संपुर्ण जाला ।। ६७६।।*

येथेही 'शडूस्छळ' असाच ग्रंथनामनिर्देश आहे आणि 'वोविप्रबंध' असाच त्याच्या रचनास्वरूपाचा निर्देश आहे. 'शडूस्छळ' हे उघड उघड 'षट्स्थल' या संस्कृत नावाचे मराठी रूप आहे. या ग्रंथात वीरशैव विचारधारेचे सारसर्वस्व असलेल्या षट्स्थल सिद्धान्ताचे विवरण असल्यामुळे याला 'षट्स्थल' ('शडूस्छळ') असे साक्षात् प्रतिपाद्यसूचक नाव ग्रंथकाराने योजले आहे.

**मऱ्हाटी टीका वोवीप्रबंध :**

ग्रंथाच्या अखेरीस ग्रंथकाराने 'मऱ्हाटी टीका वोविप्रबंधु। संपुर्ण जाला ।।' (ओ. ६७६) असे म्हटले आहे, हे आपण पाहिलेच आहे. या विधानातील 'मऱ्हाटी टीका' या शब्दांतून असे सूचित होते की, प्रस्तुत 'षट्स्थल' हा ग्रंथ स्वतंत्र नसून, अन्य भाषेतील ग्रंथाची मराठी टीका आहे. पहिल्या प्रसंगात तर 'ते हे शडूस्छळ वोविप्रबंधें। अनुवाद करीन।।' (ओ. १५८) असे सांगितल्यानंतर लगेच 'करीन मऱ्हाटी टीका।'(ओ. १५९) असे मुद्दाम स्पष्ट केले आहे. यावरून असे वाटते की, हा ग्रंथ अन्य भाषेतील षट्स्थल सिद्धान्तविषयक

एखाद्या ग्रंथाचा किंवा अनेक ग्रंथांतील विवेचनाचा आधार घेऊन मराठी ओवीछंदात रचलेला असावा. षट्स्थल सिद्धान्तावर वीरशैवांनी संस्कृत आणि कानडी या दोन्ही भाषांत रचना केलेली आहे.

**ग्रंथाचा विस्तार :**

हा ग्रंथ विस्ताराने तसा लहानच आहे. यात एकूण केवळ ६७७ ओव्या आहेत. ग्रंथाची विभागणी तीन अध्यायांत केलेली असली, तरी ओवीक्रमांक अध्यायशः वेगळे न देता सलग दिलेले आहेत. पहिल्या प्रसंगात १ ते २२९ (२२९), दुसऱ्या प्रसंगात २३० ते ३३७ (१०८) आणि तिसऱ्या प्रसंगात ३३८ ते ६७७ (३४०) ओव्या आहेत. यातील प्रसंग अन्य अध्यायविभक्त ग्रंथांतील अध्यायांप्रमाणे स्वतंत्र उपक्रमोपसंहारांनी युक्त असे नाहीत. त्यांची ओवीसंख्याही विषम आहे. मूळच्या सलग ओवीक्रमांकांनी युक्त असलेल्या 'अनुभवामृता'ची ज्याप्रमाणे उत्तरकाली दशप्रकरणात्मक मांडणी केली गेली, त्याचप्रमाणे 'षट्स्थला'ची प्रसंगविभागणी नंतर अन्य कोणी केलेली असण्याचा संभव आहे. रचनेच्या ओघात विशिष्ट प्रतिपादन संपविताना जेथे सहजपणे कर्तृनाम-निर्देश आलेला आहे, तेथे प्रसंग तोडण्याची सोय पुढिलांना प्राप्त होते.

**ग्रंथाचा कर्ता : खेचर विसा :**

'षट्स्थला'च्या कर्त्याचे नाव खेचर विसा किंवा विसा खेचर असे आहे. तीनही प्रसंगांच्या अखेरीस ग्रंथकाराने आपले नाव खेचर विसा असे नोंदविले आहे :

*हा साक्ष सीवयोगु परीयेसा।*
*चांगयासि आदि मिनु गोरक्षी ऐसा।*
*सांगे वटेश्वरु आपुलीया वौंसा।*
*खेचरु म्हणे विसा।। २२९।।*
*तोचि जाला वटेश्वरु। मग चालविला संप्रधारु।*
*त्या कारणें नमिला कृष्ण सद्गुरु।*
*खेचरु विसा म्हणे।। ३३७।।*
*या वोविया पुष्पें प्रासिं। समर्पिली मनोभावेंसिं।*
*या परी हरीख जालें वटेश्वरासि।*
*खेचरु विसा म्हणे।। ६७८।।*

याशिवाय ग्रंथाच्या अंतर्भागात एकदा विसा खेचर (ओ. १५४) आणि दोनदा नुसते खेचर (ओ.५१, १५२) असा कर्तृनामनिर्देश आलेला आहे. या नामनिर्देशावरून हे स्पष्ट

होते की, 'षट्स्थला'च्या कर्त्याचे नाव विसा खेचर असे आहे- विसा हे त्याचे नाव आहे आणि खेचर हे त्याचे विशेषण (अथवा उपनाम) आहे. कर्त्याने आपल्या नावाखेरीज स्वतःविषयीचा कसलाही तपशील नोंदविलेला नाही. नाही म्हणायला तो स्वतःचा उल्लेख काही ठिकाणी 'कृष्णाचा सुत' (ओ.१५४), 'कृष्णसुत' (ओ. ६७४) आणि 'कृष्णकुमर' (ओ. ६७५) अशाही प्रकारे करतो. या उल्लेखांतील 'सुत' आणि 'कुमर' ही पदे केवळ शिष्यत्ववाचक मानायची, की पुत्रत्व आणि शिष्यत्व या दोन्हींची निदर्शक मानायची, याचा निर्णय करण्याचे साधन आज तरी उपलब्ध नाही.

**ग्रंथकाराचा सद्गुरू : कृष्णनाथ अथवा रामकृष्णनाथ :**

कृष्णसुत अथवा कृष्णकुमर हे ग्रंथकाराने आत्मनिर्देशासाठी वापरलेले विशेषण त्याचे कृष्ण-शिष्यत्व स्पष्ट करणारे आहे, हे मात्र निश्चित आहे. कारण त्याने आपल्या सद्गुरूचा उल्लेख स्वतंत्रपणे कृष्ण (ओ. १०५), कृष्ण सद्गुरु (ओ. ८५, ३३७), कृष्णनाथ (ओ. १०४, ३४०) असा अनेकवार केलेला आहे. ग्रंथाच्या अखेरीस गुरुपरंपरा सांगताना त्याने गुरूचे नाव रामकृष्ण असे नोंदविले आहे. यावरून विसा खेचर हे कोणा कृष्णनाथाचे अथवा रामकृष्णनाथाचे शिष्य आहेत, हे उघड होते. कृष्णसुत अथवा कृष्णकुमर या विशेषणातील सुत, कुमर ही पदे शिष्यत्वद्योतक आहेत. ज्ञानदेवांनी ज्याप्रमाणे स्वतःला 'निवृत्तिनाथसुत' म्हणवून घेतले आहे अथवा गोरक्षनाथांनी ज्याप्रमाणे आपली मुद्रा 'आदिनाथनाती मछिंद्रनाथपुता' अशी घोषित केलेली आहे, त्याप्रमाणेच विसा खेचरांचे कृष्णसुत वा कृष्णकुमर हे विशेषण मानता येईल. स्वतः ग्रंथकाराने या ग्रंथात कुमर, दुहिता हे शब्द शिष्य या अर्थाने वापरले आहेतच (ओ. ६७२-६७३). अर्थात् त्यांचा सद्गुरू कृष्णनाथ हा त्यांचा पिताही असू शकेल. परंतु तसे आज तरी निश्चयाने म्हणता येणार नाही.

**ग्रंथकाराची गुरुपरंपरा :**

विसा खेचरांनी आपला सद्गुरू कृष्णनाथ याच्याविषयी नामोल्लेखापलीकडे काहीही माहिती दिली नाही. परंतु त्यांनी आपली गुरुपरंपरा मात्र ग्रंथाच्या अखेरीस संपूर्ण स्वरूपात आणि ग्रंथान्तर्गत भागात त्रुटित स्वरूपात दिलेली आहे. आपण ग्रंथात विवरिलेल्या विचारांची धारा आपणापर्यंत कोणत्या क्रमाने आली, ते सांगताना विसा खेचर म्हणतात :

*तो आदिनाथु इश्वरु। मिननाथ तो मचिंदृ।*
*तयाचा होये कुमरु। गोरेक्षीनाथु ।। ६७३।।*
*गोरेक्षीची दुहिता मुक्ताइ। चांगया वटेश्वरु पाहि।*

*उन्मेषु रामकृष्ण तोहि। वैसु (वौंसु) चांगयाचा।। ६७४।।*
*तोचि हा संप्रधारु आदिनाथांचा।*
*श्रीगोरक्षीनाथें प्रगट केला साचा।*
*तोचि विचारु कथीला योगाचा। कृष्णसुतें।। ६७५।।*

यावरून आदिनाथ- मीननाथ अथवा मत्स्येंद्रनाथ- गोरक्षनाथ- मुक्ताई- चांगा वटेश्वर- रामकृष्णनाथ अथवा कृष्णनाथ- विसा खेचर अशी ग्रंथकाराची गुरुपरंपरा असल्याचे स्पष्ट होते. पहिल्या प्रसंगातही—

*हें साध्ये केलें मिननाथें गौरक्षी।*
*मग मुक्ताईस लाविले लक्षीं।*
*तेंचि चांगदेवासि साक्षी। उपदेसिलें।। ८१।।*

असा मीननाथ— गोरक्षनाथ— मुक्ताई— चांगदेव या क्रमाने आलेल्या बोधप्रवाहाचा उल्लेख असून, याच प्रसंगाच्या अंखेरीस पुनः आदि—मीन—गोरक्ष इत्यादी क्रमाने आलेला शिवयोग वटेश्वर शिवाने आपल्या 'वंशा'तील चांगदेवाला सांगितला, असे म्हटले आहे.

**ग्रंथकाराचा संप्रदाय : नाथ संप्रदाय अथवा वटेश्वर संप्रदाय :**

विसा खेचरांची गुरुपरंपरा नाथसंप्रदायी आहे, हे मुद्दाम स्पष्ट करण्याची जरुरी नाही. विसा खेचरांनी संप्रदायासाठी पंथ (ओ. ७६, १०४, १६४), संप्रधार (ओ. ७५, १८२, ३३७, ६४८, ६५०, ६७५), मार्ग (ओ. २१७, २५०) आणि वंश-वौंस (ओ. ७९, ८४, १८३, ६७३, ६७५) अशा अनेक पर्यायी संज्ञा वापरल्या आहेत. 'नमो नमो कृष्णनाथा। तुवां विस्तारु केला आदिनाथपंथा।' (ओ. १०४) अशा शब्दांत गुरुस्तवन करताना विसोबांनी आपल्या संप्रदायाचा निर्देश 'आदिनाथपंथ' असा केला आहे. आदिनाथांचेच 'नाथ' हे लघुरूप आहे. अर्थात् आदिनाथपंथ म्हणजे नाथपंथ. 'शिवमार्ग' (ओ. २१७, २५०) हेही एक प्रकारे 'आदिनाथ' या अर्थाचेच संप्रदायनाम आहे. विसोबांच्या परंपरेतील चांगदेवाने वटेश्वर शिवाची उपासना केल्यामुळे चांगदेवोत्तर परंपरेचा उल्लेख त्यांनी 'वटेश्वराचा संप्रधार' (ओ. ७५, ६७५), 'वटेश्वरपंथ' (ओ. ७६), 'वटेश्वर वंश' (ओ. २२९) इत्यादी प्रकारे केला आहे. आदिनाथ, शिव, वटेश्वर या सर्व संज्ञा एकार्थकच असल्यामुळे त्या नाथ संप्रदायाच्याच पर्यायसंज्ञा ठरतात.

**ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय :**

या ग्रंथाचे 'षट्स्थल' हे नाव ग्रंथविषयाचे स्पष्टपणे द्योतक आहे, हे आपण ग्रंथनामाचा

विचार करताना पाहिलेच आहे. या ग्रंथाच्या प्रतिपाद्याचे स्वरूप पुढे आपण विस्ताराने पाहणार आहोतच. येथे केवळ ग्रंथाच्या विशिष्ट प्रतिपाद्यामुळे शोधाच्या नव्या दिशा कशा उजळतात, हे सूचित करण्यापुरताच ग्रंथविषयाचा पुनरुच्चार करणे आवश्यक आहे. विसोबांनी आपल्या प्रतिपाद्य विषयाचा निर्देश षट्स्थल, षट्स्थलज्ञान, षट्स्थलविचार, शिवागम, शिवयोग, सिद्धान्तयोग या संज्ञांनी अनेकवार केला आहे. 'कथीले शडूस्छळज्ञान' (७९), 'ऐसा शडूस्छळविचारु' (८०), 'विचारु शडूस्छळाचा हा' (८०), 'तेणें प्रगटिला हा पंथु। शडुस्छळाचा' (१६४), 'शडुस्छळाचा स्छापनाविचारु' (१६५), 'शडूस्थळीं विवरु केला तेणें' (१६६) इत्यादी अनेक ठिकाणी 'षट्स्थल' या संज्ञेलाच प्राधान्य देऊन विसोबांनी आपल्या ग्रंथाचे प्रतिपाद्य निर्देशिले आहे; तर अन्यत्र 'शिवयोग' वा 'शिवागम' या संज्ञांचाही अनेकदा वापर केला आहे; 'म्हणौनिया हा शिवयोगु। जो जाणे या शडूस्छळाचा मार्गु' (१८५), 'जयासि शिवयोगिचें ज्ञान। तयासि शडुस्छळिचें विवरण' (१८६), 'हे सीवागमिचे ज्ञान। साक्ष सीधांतयोग जाण'(१९२), 'हा साक्ष सिवयोगु परियेसा' (२२९), 'तो हा सीवाचा आगमु। साक्ष सिवयोगु सुगमु' (२४३), 'सीवशास्त्रिं निपुन। तो सर्वज्ञ देखा' (३२५), 'ऐसे ते सिवज्ञानी। सीवागमी निर्वाणि। शिवयोगावाचुनी। आणिक नेणतिच।।' (३२७) इत्यादी उदाहरणांवरून आपल्या हे ध्यानी येईल की, विसोबा खेचर आपला षट्स्थलविचार हा शिवागमान्तर्गत अथवा शिवशास्त्रान्तर्गत मानतात आणि त्यालाच 'शिवयोग' अथवा 'शिवज्ञान' असे पर्याय योजतात. म्हणजेच शिवशास्त्र अथवा शिवागम व्यापक आहे आणि षट्स्थलविचार हा त्या शास्त्राचा एक अंश आहे. अर्थात् अंशासाठी पूर्णाची संज्ञा वापरण्याची प्रथा असल्यामुळे 'षट्स्थलविचार', 'शिवयोग', 'शिवागम' या सर्व संज्ञा विसोबांनी आपल्या ग्रंथाचा विषय सांगण्यासाठी मुक्तपणे योजलेल्या आहेत. आपल्या ग्रंथात प्रतिपादिलेला शिवागमान्तर्गत षट्स्थलविचार हा वीरशैव संप्रदायाशीच निगडित आहे, हेही ग्रंथकाराने अगदी निःसंदिग्ध शब्दांत सांगितले आहे :

*हा सिवागमिचा आचारु। विरसैव उपदेसु विचारु।*
*यैसा याचा निरुता प्रकारु। जाणावा देखा।। ४५०।।*

या सर्व निर्देशांचा विचार करता असे स्पष्टपणे दिसून येते की, विसोबा खेचरांच्या या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय शिवागमान्तर्गत षट्स्थलविचार हा असून, तो वीरशैव संप्रदायाशी निगडित आहे.

**'षट्स्थल' ग्रंथाचे अनेकविध महत्त्व :**

'षट्स्थल' या नवोपलब्ध ग्रंथाचा आपण येथवर जो स्थूल परिचय करून घेतला आहे, त्यावरून या ग्रंथाच्या अध्ययनाचे अनेकविध महत्त्व सहज जाणवू लागते. 'षट्स्थला'च्या

कर्त्याची गुरुपरंपरा, त्याचा संप्रदाय आणि त्याने आपल्या ग्रंथासाठी निवडलेला विषय या तीन बाबींमुळे यादवकालीन मराठी वाङ्मयाच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीचा शोध घेण्याच्या नव्या दिशा उजळू लागतात. प्रस्तुत कालखंडाविषयीच्या आपल्या प्रचलित कल्पनांना धक्के बसू लागतात; आजवर न सुटलेल्या समस्यांची उकल होण्यासाठी काही निश्चित स्वरूपाचे दुवे हाती लागल्याचा आनंद होतो आणि आद्य मराठी वाङ्मयाच्या शिल्पकारांचे विचारशिल्प कसकसे आकारत गेले, याचे आकलन या ग्रंथाच्या सूक्ष्म अध्ययनाने होऊ शकेल, असा विश्वास वाटू लागतो. 'षट्स्थला'च्या अध्ययनाचे हे अनेकविध महत्त्व काहीशा तपशिलाने सांगावयाचे झाले, तर असे सांगता येईल :

१. 'षट्स्थला'चा कर्ता विसोबा खेचर आहे. आपल्या आजवरच्या समजुतीनुसार विसोबा खेचर हे ज्ञानदेवांचे अनुयायी आहेत, ज्ञानेश्वर मंडळाचे भक्त आहेत; परंतु प्रस्तुत ग्रंथात विसोबांनी निर्दिष्ट केलेल्या गुरुपरंपरेत ज्ञानदेवांचा अथवा त्यांच्या भावंडांपैकी अन्य कोणाचाही निर्देश नाही. विसोबांचा ज्ञानेश्वर मंडळाशी संबंध केव्हा आला?

२. 'षट्स्थला'त विसोबांनी आपल्या गुरूचे नाव कृष्णनाथ अथवा रामकृष्णनाथ असे दिले आहे. पारंपरिक समजुतीनुसार ज्ञानदेव (अथवा सोपानदेव) हे विसोबांचे गुरू मानले जातात. विसोबांनी दोन गुरू केले होते काय? त्यांचे पौर्वापर्य कसे ठरवावयाचे?

३. विसोबांनी आपली गुरुपरंपरा आदिनाथ- मत्स्येंद्रनाथ- गोरक्षनाथ- मुक्ताबाई- चांगदेव- कृष्णनाथ- विसोबा अशी दिली आहे. प्रचलित समजुतीनुसार चांगदेव अथवा चांगा वटेश्वर हे ज्ञानेश्वरभगिनी मुक्ताबाईचे शिष्य होते; परंतु 'षट्स्थला'तील परंपराक्रमानुसार चांगा वटेश्वर हे गोरक्षशिष्य मुक्ताबाईचे शिष्य होते. त्यांचा गहिनीनाथ-ज्ञानदेव-मुक्ताबाई यांच्याशी असलेला परंपरासंबंध विसोबांनी निर्देशिला नाही. ही गोरक्षशिष्या मुक्ताबाई कोण? ती ज्ञानेश्वरभगिनीहून वेगळी आणि ज्येष्ठ होती काय? महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधरस्वामी यांना त्यांच्या एकाकी भ्रमणाच्या काळात एक मुक्ताई योगिनी भेटली होती. ती आणि ही गोरक्षशिष्या मुक्ताई एक तर नव्हे? जर या दोन व्यक्ती वेगळ्या नसून एकच असतील, तर चक्रधरस्वामी-मुक्ताई-भेटीचा अन्वयार्थ कोणता?

४. विसोबांची गुरुपरंपरा नाथपंथी आहे, हे उघड आहे. त्यांनी आपल्या संप्रदायाचे नाव अनेकवार स्पष्टपणे नोंदविले आहे. असे असूनही त्यांनी आपल्या ग्रंथात वीरशैवांच्या तत्त्वज्ञानातील षट्स्थलविचाराचे विवरण का केले? नाथ संप्रदाय आणि वीरशैव संप्रदाय यांचे संबंध कोणते? नाथपंथी विसोबांकडे वीरशैव विचारांचा वारसा नेमका कोणत्या माध्यमातून आला?

५. 'षट्स्थला'तील परंपरावृत्तामुळे आणि तत्त्वविवरणामुळे असे जे मूलभूत स्वरूपाचे

अनेक प्रश्न निर्माण होतात, त्या प्रश्नांच्या कक्षेत ज्ञानदेव, चांगदेव, चक्रधरस्वामी यांसारख्या यादवकालीन महनीय व्यक्ती येतात; त्याचप्रमाणे नाथ, महानुभाव आणि वीरशैव या तत्कालीन प्रख्यात संप्रदायांच्या परस्परसंबंधांचा गुंताही येतो. या गुंत्याची नेमकी कल्पना स्थूलपणाने विचार करून येऊ शकणार नाही. आपण या सर्व प्रश्नांना सामोरे जाऊन विश्लेषणाला प्रवृत्त झालो, म्हणजे आणखीही अनेक आनुषंगिक प्रश्न उपस्थित होतील आणि त्यांच्या उकलीच्या दिशाही गवसू लागतील.

'षट्स्थला'चे सर्वांगीण अध्ययन हे यादवकालीन सांस्कृतिक इतिहास आणि पर्यायाने वाङ्मयीन इतिहास बोलका करण्यास नितांत उपयुक्त ठरणार आहे, हे येथवर सूचित झालेच आहे. 'षट्स्थला'तील सामग्रीचा वापर करून यादवकालीन सांस्कृतिक इतिहासाची काही पर्वे पुनर्रचित करावयाची झाली, तर अन्य अनेकानेक साधनांचा धांडोळा घ्यावयाला हवा; पूर्वोपलब्ध सुपरिचित मराठी साधनांचे निरीक्षण नव्या दृष्टीने करायला हवे; तसेच काही नवोपलब्ध मराठी साधने प्रथमच या संदर्भात विचारात घ्यायला हवीत. प्रस्तुत संदर्भात आजवर अलक्षित राहिलेली अशी सर्व मराठी व मराठीपूर्व संस्कृत-प्राकृत साधने आणि मराठीतर लोकभाषांतील साधने आधाराला घेऊन, मी माझ्या 'चक्रपाणि' (पुणे, १९७७) या ग्रंथात यादवकालीन मराठी वाङ्मयाच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीची नवी मांडणी केलेली आहे, हे जाणकार वाचकांना माहीतच आहे. 'चक्रपाणि' हा ग्रंथ म्हणजे 'षट्स्थला'ची बृहत् प्रस्तावनाच आहे.

**विसोबांची पारंपरिक चरित्रकथा :**

'षट्स्थल' या ग्रंथाचे कर्ते विसोबा खेचर यांचे चरित्र उपलब्ध नाही. त्यांच्यासंबंधीच्या चार-दोन कथा भक्तचरित्रकारांनी आळविलेल्या आहेत. त्यांतून त्यांच्याविषयी काही स्थूल कल्पना करता येते. कोणी त्यांना पैठणजवळील मुंगीचे मानतात, तर कोणी आळंदीचे रहिवासी मानतात. ते नामदेवांचे सद्गुरू होत, या बाबतीत मात्र सर्व पारंपरिक वृत्तांची एकवाक्यता आहे. 'विसोबा खेचर जाण। राहे मुंगीमाजी आपण। खिस्तीचा उदीम करून। काळक्रमण करीतसे।।' ही दासो दिगंबरांच्या 'संतविजया'तील ओवी वि. ल. भावे यांनी 'महाराष्ट्र-सारस्वता'त उद्धृत केली आहे,[४] तीवरून विसोबा हे मुंगीचे रहिवासी असून खिस्तीचा (सावकारीचा) व्यवसाय करीत असत, असे दिसते. परंतु महीपतींनी 'भक्तविजया'मध्ये एक विसोबा चाटी म्हणून। बहु कुटिल होता ब्राह्मण।' असे त्यांचे वर्णन करून, त्यांचा रहिवास आळंदी येथे असल्याचे व त्यांचा व्यवसाय चाट्याचा (कापड-व्यापाऱ्याचा) असल्याचे म्हटले आहे.[५] ज्ञानदेवांनी मांडे खाण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावर मांडे भाजण्यासाठी कुंभाराकडे गेलेल्या मुक्ताईला विसोबांनी खापर मिळू दिले नाही, अशी

हकीकत महीपतींनी दिली आहे. निराश होऊन परत आलेल्या मुक्ताईला दिलासा देण्यासाठी ज्ञानदेवांनी योगबळाने आपली पाठ प्रदीप्त केली व तिच्यावरच मांडे भाजण्यास सांगितले, ही चमत्कारकथा महीपतींनी विसोबा चाटींच्या कुटिलतेच्या पार्श्वभूमीवर कथन केली आहे. ज्ञानदेवांचे योगसामर्थ्य प्रत्ययास आल्यावर विसोबा त्यांना सर्वभावाने शरण गेले आणि त्यांचे शिष्य बनले, असा या कथेचा शेवट महीपतींनी केला आहे.

विसोबांनी नामदेवांना उपदेश केला, तो बार्शी येथील शिवमंदिरात, की औंढ्याच्या नागनाथ-मंदिरात, याविषयीही मतभेद आहेत. 'द्वादशीचे गावी उपदेश केला।' अशी एक परंपरा आहे,[६] तर गुरुबोध प्राप्त करण्यासाठी 'चिंताग्रस्त नामा आला आवंढ्यासी।' असे 'नामदेवगाथ्या'तील नामदेवचरित्रपर अभंगांत (क्र. १३२) स्पष्ट म्हटले आहे.[७]

विसोबांच्या नावावर जे अभंग मोडतात, त्यांतील चार-दोनच त्यांचे आहेत; बाकी बहुतेक अभंग 'नामदेवचरित्रकथेचे' घटक आहेत.[८]

विसोबांच्या समाधीचा तपशील नोंदविणारा एक अभंग ज. र. आजगावकर यांनी महाराष्ट्र-कवि-चरित्रमालेच्या आठव्या खंडात उद्धृत केला आहे.[९]

*विमानांची दाटी पुष्पांचा वर्षाव।*
*अप्सरा गंधर्व नाचताती।। १।।*
*अलंकापुर क्षेत्र इंद्रायणीतीर।*
*मनीं ज्ञानेश्वर आठविला।। २।।*
*मग आठविला पंढरीचा राव।*
*देवाधिदेव पांडुरंग।। ३।।*
*सौम्य संवत्सर बाराशे एकतीस।*
*शुद्ध श्रावण मास एकादशी।। ४।।*
*निर्गुण निराकार स्वरूपीं मिळाला।*
*खेचर बैसला समाधीसी।। ५।।*

या अभंगावरून असे दिसते की, विसोबा खेचर यांनी सौम्य नाम संवत्सर शके १२३१ या वर्षी श्रावण शुद्ध एकादशीच्या दिवशी इंद्रायणीतीरी आळंदी येथे समाधीचा स्वीकार केला. परंतु भावे यांनी 'हा शके १२३१ मध्ये श्रावण शु. एकादशीस समाधिस्थ झाला. याची समाधी बार्शीस आहे'[१०] असे विधान करून समाधिस्थळ वेगळे सांगितले आहे.

पांगारकरांनी विसोबांना औंढ्यांचे रहिवासी मानले आहे.[११] "नरसीपासून पाच कोसांवर औंढे नागनाथ नामक फार पुरातन शिवक्षेत्र प्रसिद्ध आहे. तिथे विसोबा खेचर हे राहत

असत. हे यजुर्वेदी ब्राह्मण पूर्वी सराफीचा धंदा करीत. पुढे हे ज्ञानेश्वर मंडळात समाविष्ट झाल्यानंतर योगज्ञानात निपुण झाले व साधू म्हणून मानले जाऊ लागले."

**विसोबांचे 'खेचर' पद :**

विसोबांचे मूळ स्थान, त्यांचा व्यवसाय, त्यांनी नामदेवांना उपदेश केल्याचे स्थान आणि त्यांची समाधिभूमी या सर्व बाबतीत मतभेद आहेत. तसेच मांडे भाजण्याची कथा आणि नामदेवांना बोध केल्याची कथा या दोन कथांशिवाय त्यांच्या चरित्रातील अन्य कोणत्याही घटनेची दंतकथात्मक सुद्धा नोंद आढळत नाही.

महीपतींनी मांडे भाजण्याच्या कथेच्या संदर्भात विसोबांच्या 'खेचर' या पदाचे स्पष्टीकरण दिले आहे. ज्ञानदेवांनी आपल्या पाठीवर योगाग्नी प्रदीप्त करून मुक्ताईकरवी मांडे भाजविल्याचे पाहिल्यावर विसोबांना पश्चात्ताप झाला आणि ते 'ऐसा अनुताप धरून। म्हणे आतां यांस जावें शरण। बळें उच्छिष्ट प्रसाद भक्षून। आपुलें स्वहित करावें।।' या उत्कट इच्छेने धावत धावत ज्ञानदेवांच्या पात्रातील घास तोंडात घालू लागले—

*मुखांत घालितां सत्वर। काय बोलती ज्ञानेश्वर।*
*तूं कां होसी गा खेचर। सर परता वेगेंसीं।।*
*ऐसी ऐकूनियां वाणी। हाचि उपदेश धरिला मनीं।*
*परापश्यंतीमध्यमेहुनी। वैखरीपरता सरतसे।।*
*चहूं वाचातीत जें असे। तेथें मिळाला समरसें।*
*अविद्येचें काळवसें। समूळ गेलें तेधवां।।*
*मग जोडूनियां दोनी कर। मस्तक ठेविला चरणांवर।*
*ज्ञानदेवें जाणोनि अंतर। अभयवर दिधला।।*
*सर परता खेचरा ऐसें। ज्ञानदेवें म्हणितलें तयास।*
*विसोबा खेचर नाम त्यास। तैंपासून म्हणताती।।*

(भक्तविजय, ९. १९४-१९६, १९८, २००)

महीपतींनी दिलेल्या या हकीकतीतील स्पष्टीकरण सत्य मानायचे झाले, तर ज्ञानदेवांनी विसोबांच्या पाखंडीपणामुळे त्यांना 'अरे खेचरा, परता सर!' असे म्हटले आणि विसोबांनी ते संबोधन प्रसाद म्हणून आनंदाने स्वीकारून, अलौकिक अर्थाने सार्थ केले, असे 'खेचर' या पदाचे रहस्य सांगता येईल. ज्ञानेश्वरीत या दोन्ही अर्थांनी 'खेचर' ही संज्ञा आलेली आहे. 'फुटे खेचराही सात्त्विकाचा पान्हा'(१३. १२५३) असे जेव्हा ज्ञानेश्वर म्हणतात, तेव्हा त्यांना खेचरता आणि सात्त्विकता या परस्परविरुद्ध भूमिका असल्याचे सुचवायचे आहे. खेचर हा शब्द यक्ष-राक्षसवाचक असल्यामुळे, तो तमोगुणाचा सूचक आहे. 'सर परता

खेचरा'...असे म्हणताना, ज्ञानदेवांना त्यांच्या पूर्वीच्या तामस वृत्तीचा निषेध करावयाचा आहे. पुढे योगसाधनेने विसोबा हे देहभावविगलित बनले, तेव्हा त्यांच्या 'खेचर' या पदाला एक वेगळी प्रतिष्ठा प्राप्त झाली. ज्ञानेश्वरांच्या शब्दांत सांगावयाचे झाले तर–

*ना तरि कदलिचा गाभा। बूंथि सांडूनु उभा।*
*कां अवेवुचि नभा। निवडला तो।।*
*तैसें होये शरीर। तैं तें म्हणिजे खेचर।*
*हे पद होतां चमत्कार। पिंडु जनीं।।*

(ज्ञानेश्वरी ६. २९६-२९७)

महामहोपाध्याय द. वा. पोतदार यांना महाराष्ट्रात 'खेचर' आडनावाचे एक घराणेच आढळले.[१२] त्या संदर्भात त्यांनी विसोबांचे 'खेचर' हे आडनाव असण्याची शक्यता सूचित केली आहे. अर्थात् ते त्यांचे आडनाव जरी ठरले, तरी त्या पदाला साजेसा योगाधिकार त्यांनी प्राप्त केला होता, यात मात्र मुळीच संशय नाही.

**विसोबांचे गुरू :**

महीपतींनी रंगविलेल्या मांडे भाजण्याच्या कथेत, 'ज्ञानदेवें जाणूनि अंतर। अभयवर दिधला।' अशा शब्दांत विसोबांना ज्ञानदेवांनी कृतार्थ केल्याचे वर्णन आहे.[१३] 'मग म्हणे खेचरु। मज ज्ञान हेचि गुरु। तेणें अगोचरु। केला नामा।।' किंवा 'महाविष्णूचा अवतार। श्रीगुरु माझा ज्ञानेश्वर।' अथवा 'अलंकापुरीं राहिली। श्रीगुरु ज्ञानाई माउली।' इत्यादी विसोबांच्या नावावर मोडणाऱ्या अभंगांतील गुरुविषयक निर्देश महीपतींच्या म्हणण्याला पोषक आहेत.[१४] परंतु याच्याशी विसंवादी असे निर्देशही त्यांच्या तोंडी आढळतात. 'माझी मूळपीठिका सोपान सद्‌गुरु। तेणें माथां करु ठेवियेला।।' अथवा 'चांगयाचा अंगीकार मुक्ताईनें केला। सोपान वोळला मजवरी।।' या वचनांत सोपानदेवांचे नाव गुरू म्हणून उद्घोषिले आहे.[१५] 'जय जय आरती सोपानदेवा। ओवाळीं खेचरु विसा जीवींचिया जीवा।।' अशी त्यांनी रचलेली सोपानदेवांची आरतीही प्रचलित आहे. सोपानदेवांनीच आपणांस खेचरी मुद्रा देऊन जन्ममरणाचे भय निवारले, असेही उद्‌गार त्यांच्या तोंडी आढळतात. 'नामयाचा गुरु। तो हा सोपान सद्‌गुरु।' असे जनाबाईच्या नावावरील एका अभंगात म्हटले आहे. ज्ञानदेव की सोपानदेव, एवढ्यानेच विसोबांच्या गुरूबद्दलची भ्रांती मिटत नाही. 'मुक्ताईनें बोध खेचरासी केला। तेणें नामयाला बोधियेलें।।' अशीही एक पारंपरिक नोंद आहे.[१६] म्हणजे ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताई ही तीनही भावंडे विसोबांच्या गुरुपदावर विराजमान झालेली आहेत.

विसोबांच्या गुरूविषयीच्या या अनेकत्वाचे रहस्य असे दिसते की, ज्ञानदेव मंडळाशी चांगदेव आणि त्यांचे सर्व शिष्य-प्रशिष्यमंडळ संबंधित झाल्यानंतर विसोबांनी, त्या एकाहून एक विलक्षण पात्रतेच्या भावंडांविषयी अत्यंत भक्तीने आपल्या भावना व्यक्त केल्या; त्यांना आपल्या सद्‌गुरूंच्या बरोबरीचे स्थान देऊन गौरविले. जर असे नसते, तर गुरू म्हणून कोणा तरी एकाच व्यक्तीचा उल्लेख केला गेला असता; तीनही भावंडांना गुरू म्हणून संबोधिले नसते.

विसोबांनी आपल्या 'षट्स्थल' या ग्रंथात अगदी निःसंदिग्ध शब्दांत आपल्या गुरूच्या नावाचा उल्लेख 'कृष्णनाथ' असा करून, स्वतःला अभिमानाने 'कृष्णकुमर' म्हणवून घेतले आहे, हे आपण मागे पाहिलेच आहे.

**'शिल्पशास्त्रां'तील परंपरा :**

विसोबा, चांगा वटेश्वर आणि 'षट्स्थल' सिद्धांत यांच्याविषयी जिव्हाळा प्रकट करणारा आणि विसोबांवर विशेष प्रकाश टाकणारा 'शिल्पशास्त्र' या नावाचा एक अलक्षित मुद्रित ग्रंथ मला उपलब्ध झाला आहे.[१७] या ग्रंथाचे आठ अध्याय असून, त्याची ओवीसंख्या (२८ + ४५ + १७ + ५७ + ६४ + ७० + २७ + २५ =) ३३३ आहे. कदाचित् ती थोडी जास्त असेल. कारण मुद्रित ३२ पत्रांपैकी क्र. २९-३० ही दोन पत्रे नष्ट झालेली आहेत. त्यांत सातव्या अध्यायाच्या शेवटच्या (२८ पासून) आठ ओव्या आणि आठव्या अध्यायाच्या प्रारंभीच्या चौदा ओव्या नष्ट झालेल्या आहेत. शेवटच्या पत्रावर, "हा ग्रंथ शके ११६५ शोभन नाम संवत्सरे माहे वैशाख शुद्ध ५ तदिने समाप्त झाला. तो फार प्रयासाने बाळा सहादू सुतार, मुक्काम इगतपुरी, यांनी मिळवून नासिक येथे 'श्रीसमर्थ' छापखान्यात छापविला. शके १८२८, सन १९०६, किंमत ८ आणे" असा तपशील छापलेला आहे. म्हणजे मुद्रकाला ८ अध्यायांअखेरपर्यंतच ग्रंथसमाप्तिकाळाच्या नोंदीसह त्याचे हस्तलिखित उपलब्ध झालेले दिसते. प्रत्यक्षात आठव्या अध्यायाच्या अखेरीस ग्रंथ समाप्त झालेला दिसत नाही. शेवटपर्यंत विषयविवेचन चालू राहिलेले असून, शेवटची ओवी अशी आहे-

*आतां त्रिसंध्या बोलती। संस्कृत यथामती।*
*ते सांगितली आत्मस्थिती। अवधारिजो।।८.२५*

या ओवीवरून हे उघड आहे की, येथे ग्रंथ संपलेला नाही. ग्रंथकाराने ग्रंथाचा उपसंहार केलेला नाही. कोणत्याही अध्यायाच्या अंती अथवा अन्यत्र ग्रंथकाराचे नाव नोंदलेले नाही. 'शिल्पशास्त्र' हे ग्रंथनाम मात्र सर्व अध्यायांच्या अंती आढळते. आठव्या अध्यायाच्या अखेरीस 'इति शिल्पशास्त्र अत्रिदत्तात्रेयसंवाद नाम प्रसंग आठवा।।' असा उल्लेख आहे. दत्तात्रेयाकडे ग्रंथाचे कर्तृत्व वारंवार दिले आहे. ग्रंथारंभी गणेशनमनानंतर 'श्रीगुरुदत्तात्रेयाय

नमः।। श्रीबोधराजाय नमः।। श्रीगोपाळकृष्णाय नमः।।' अशी नमने आहेत.

*ऐसा पंचब्रह्माचा विचार। शिल्पशास्त्राचा अंकुर।*
*ते सांगे ऋषेश्वर। दत्तात्रेय योगिया।। १.२८*
*दत्तात्रेय अवधूत। तेणें निर्मिला हा ग्रंथ।*
*विश्वकर्म्याचें जें कृत्य। मनु आचार्या।। २.४५*
*हें शिल्पशास्त्र जाण। संस्कृताचें प्राकृत आख्यान।*
*केलें दत्तात्रेयें आपण। पहा पांचाळांलागीं।। ३.१६*
*त्या आचार्यांचे पुरुषार्थ। वेदशास्त्राचा मथितार्थ।*
*निवडावया श्रीगुरु समर्थ। दत्तात्रेय योगिया।। ४.५७*
*म्हणोनि भिक्षा आनंदभरितु। सदा संतुष्ट वर्ततु।*
*ऐसा करूनि सिद्धान्तु। दत्तात्रेय योगिया।। ६.७०*

हे सारे उल्लेख दत्तात्रेयाकडे कर्तृत्व देणारे आहेत. पहिल्या अध्यायात मंगलाचरणप्रसंगी सरस्वतीला नमन करताना असे म्हटले आहे की–

*तिचें नाव हेरंबजननी। तिच्या लागेन चरणी।*
*वदेल ग्रंथनिरूपणीं। श्रीकृष्णनाथ।। १.८*

या ओवीतील 'श्रीकृष्णनाथ' हे तर कर्त्याचे नाव नव्हे? की ते कर्त्याच्या गुरूचे नाव आहे आणि दत्तात्रेय हे त्याच्या उपास्याचे नाव आहे? असे असण्याचाच संभव अधिक दिसतो. ग्रंथकार हा कोणा श्रीकृष्णनाथांचा शिष्य आहे, असे दिसते.

मुद्रकाने छापलेला समाप्तिकाळ (वैशाख शु. ५, शके ११६५, शोभन नाम संवत्सर) हा ग्रंथरचनाकाळ आहे, याची खात्री देण्याचेही साधन उपलब्ध नाही. मुद्रक म्हणतो, त्याप्रमाणे हा ग्रंथ शके ११६५ इतका प्राचीन असेल, तर त्यातील उल्लेखांचे महत्त्व फार मोठे ठरेल.

हा ग्रंथ पांचाळांची उत्पत्ती आणि त्यांचे जगदुत्पत्तिविषयक विचार यांची मांडणी करणारा आहे. पांचाळांमध्ये सुतार, सोनार, तांबट, लोहार, पाथरवट या शिल्पजीवी जातींचा समावेश होत असल्यामुळे, ते सृष्टीच्या विराट शिल्पाशी नाते सांगतात आणि आपले ज्ञातिविषयक तत्त्वज्ञान 'शिल्पशास्त्र' या संज्ञेने उल्लेखितात. या 'शिल्पशास्त्र' ग्रंथात शिवाच्या सद्योजातादी पंचमुखांपासून म्हणजे पंचब्रह्मांपासून पंचभूतात्मक सृष्टीची निर्मिती कशी झाली आणि सृष्टीचे हे शिल्प घडविणाराने मनू, मय, त्वष्टिक, शिल्पक, आणि दैवज्ञ या पाच आचार्यांकरवी पांचाळांची शिल्पकार परंपरा कशी निर्माण केली, ते

विस्तारपूर्वक सांगितले आहे. शैव संप्रदायात वारंवार वापरली जाणारी 'पंचब्रह्म' ही संज्ञा या ग्रंथात अनेकदा उपयोगात आणली आहे. आपल्या दृष्टीने या ग्रंथाची सर्वांत महत्त्वाची विशेषता ही आहे की, ग्रंथकाराने सांगितलेली परंपरा चांगदेव-विसोबांशी नाते जोडणारी आहे :

*आम्ही कवणाचे वंशिक। आम्हांसि कवणें केलें देख।*
*ऐसा विचारविवेक। तें कळेचीना।।*
*अमुचा वंश कोठूनि झाला। कवणें हा गुरुमार्ग रचिला।*
*आणि हा कैसा आगमु स्थापिला। तो कवणें परी।।*
*तेंचि शिवाचारनिष्ठा। चांगदेवें केली प्रतिष्ठा।*
*आचारधर्म वरिष्ठा। स्थापिला तेणें।।*
*ध्यानधारणासंधि। आसनसाधनासिद्धि।*
*वटेश्वर शिल्पशास्त्र शोधी। कैसें पूर्ण।।*
*तया चांगदेवाचे वंशीं। अकराशें शिष्य परियेशीं।*
*तो शिवब्राह्मण सत्शिष्यांशीं। आचार्य विसा।।* २.४०-४४

आपण (म्हणजे पांचाळज्ञातीय जन) कोणाचे 'वंशिक' आहो, आपला वंश कोठून झाला, आपला गुरुमार्ग कोणी रचला आणि आपल्याला मान्य असलेला 'आगम' हा कोणी कसा स्थापिला, या प्रश्नांची उत्तरे देताना ग्रंथकाराने अत्यंत मौलिक माहिती पुरवली आहे. आपला वरिष्ठ आचारधर्म हा शिवाचारनिष्ठ असून, त्याची प्रतिष्ठा चांगदेव वटेश्वराने केली आणि त्या चांगदेवाच्या वंशातील म्हणजे परंपरेतील अकराशे शिष्यांचा आचार्य शिवब्राह्मण विसा हा बनला, असे ग्रंथकाराचे म्हणणे आहे. याच परंपरेचा उच्चार त्याने पुनः केला आहे–

*ते हे गुरुलिंगजंगम। बोलिजे शिवागम।*
*शिवदर्शन हें जाण। तेथून जाहलें।।*
*ते आचरती ब्रह्मनिष्ठा। पंचब्रह्ममाहात्म्य प्रतिष्ठा।*
*चांगदेव वंशवरिष्ठा। आचार्य तो।।*
*तें पंचब्रह्ममाहात्म्य तत्त्वता। येथें ऐसी आचारव्यवस्था।*
*कथित झाला तत्त्वता। विश्वेश्वरु।।* ५.६१-६३

येथे पुनः शिवागम, शिवदर्शन, आद्याचार्य चांगदेव आणि त्यांचा वारसा चालविणारे आचार्य विश्वेश्वर (विसा) यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख आहे. चांगा वटेश्वरांच्या परंपरेतील

अकराशे सत्शिष्यांचा आचार्य म्हणून ग्रंथकाराने विसा अथवा विश्वेश्वर यांचा उल्लेख दोन वेळा अगदी निःसंदिग्ध स्वरूपात केला आहे. हा उल्लेख खेचर विसा यांच्याविषयी आहे, यात मुळीच संशय उरत नाही. नामसाम्य ध्यानी घेता 'शिल्पशास्त्रा'चा कर्ता विसोबा खेचरांचे पांचाळ ज्ञातीतील आचार्यत्व मानतो, हे निर्विवाद सत्य आहे. आणखी विशेष हे की, 'तो शिवब्राह्मण सत्शिष्यांशी। आचार्य विसा।।' (२.४४) या शब्दांत त्याने विसोबांची 'शिवब्राह्मण'ही ज्ञातीही प्रकट केली आहे. म्हणजे विसोबा खेचर हे पांचाळांपैकी होते आणि पांचाळांच्या समाजात त्यांना आचार्य-प्रतिष्ठा होती, असा निष्कर्ष आपल्या हाती येतो.

शिवागमनिष्ठा, चांगा वटेश्वर आणि विसोबा खेचर यांच्याविषयीच्या या श्रद्धेच्या पार्श्वभूमीवर 'वदेल ग्रंथनिरूपणीं। श्रीकृष्णनाथ।।' (१०८) हा मंगलाचरणातील श्रीकृष्णनाथांचा नामनिर्देश चिंतनीय ठरतो. विसोबांनी आपल्या 'षट्स्थल' ग्रंथात आपल्या सद्गुरूचे नाव रामकृष्णनाथ अथवा कृष्णनाथ असेच दिलेले असून, स्वतःला 'कृष्णकुमर' असे अभिमानाने म्हणून घेतले आहे. याचा अर्थ असा होतो की, शिवागम, चांगदेव आणि विसा यांच्याविषयी परमश्रद्धा बाळगणारा आणि श्रीकृष्णनाथांचा शिष्य असलेला 'शिल्पशास्त्रा'चा कर्ता हा विसोबा खेचरांचा गुरुबंधू ठरतो– 'कृष्णकुमर'च ठरतो.

'शिल्पशास्त्र' या ग्रंथात शिवागम, शिवाचार (२.१६-१७), वेदांत-सिद्धांत (२.१८, २.२९, ४.१८), स्थळविवरण (२.१) गुरुमुख (३.५), शिवैक्य (५.४७), लिंग, लिंगधारण (६.६३-६४), जंगम (२.२१, ५.४१, ६.६४), शिवज्ञानी (२.२१), शिवमुनी (५.४१), शिवगुरु (२.२१), इत्यादी महत्त्वाच्या संज्ञांचा वापर केलेला असून, मरुळसिद्ध, एकोरामय्या, रेवणसिद्ध, पंडिताराध्य या वीरशैव आचार्यांना आपले पूर्वाचार्य म्हणून मानले आहे. 'शिल्पशास्त्र'काराची परिभाषा आणि त्याच्या ग्रंथाचा विषय ही दोन्ही त्याच्या ज्ञातीचे आचार्य जे विसोबा खेचर यांच्या 'षट्स्थल' ग्रंथातील प्रतिपाद्याशी सर्वस्वी संवादी आहेत, हे मुद्दाम ध्यानी घ्यावयास हवे.

विसोबा खेचरांच्या पारंपरिक चरित्रात, ते यजुर्वेदी ब्राह्मण असून, सराफीचा धंदा करीत असत, असा त्यांच्या ज्ञातीचा व व्यवसायाचा निर्देश आढळतो.[१८] 'शिल्पशास्त्रा'चा कर्ता त्यांना 'शिवब्राह्मण' म्हणतो– पांचाळज्ञातीपैकी मानतो. पारंपरिक चरित्रातील त्यांचा सराफीचा व्यवसाय लक्षात घेतला, तर ते पांचाळांपैकी सोनार असले पाहिजेत, असे मानावे लागते. पांचाळही वेगवेगळ्या वेदांशी आपल्या वेगवेगळ्या शाखांचा संबंध जोडतातच. त्यामुळे विसोबा हे यजुर्वेदाशी संबंध जोडणाऱ्या सोनार जातीचे होते, असे म्हणता येईल. पांचाळांत मोडणाऱ्या जाती चांगदेवपूर्व कालात अथवा चांगदेवकाळात स्वतंत्रपणे वीरशैव संप्रदायात

समाविष्ट झालेल्या असतील, तर विसोबांना षट्स्थलविचार हा त्यांच्या ज्ञातीतच मिळाला आणि तो गुरुपरंपरेने अधिक पुष्ट झाला, असे मानावे लागेल. एकूण, 'शिल्पशास्त्र' हा ग्रंथ विसोबांवर विशेष प्रकाश टाकणारा आहे, हे मान्य करायलाच हवे.

**'षट्स्थला'तील पांचाळ पंचाचार्य :**

'शिल्पशास्त्रा'त पांचाळांच्या ज्या मनू आदी पंचाचार्यांची अथवा पांचाळज्ञाति-प्रवर्तकांची नावे आलेली आहेत, त्यांची नावे विसोबांच्या 'षट्स्थला'तही आलेली आहेत, प्रतलेखकाच्या अज्ञानजन्य हस्तदोषांमुळे मय आणि दैवज्ञ या दोन नावांच्या जागी अपपाठ निर्माण झालेले आहेत, ते दूर करून 'षट्स्थला'तील पंचाचार्यनिर्मितीच्या ओव्या पुढे देत आहे :

*तरि सद्योजाता मुखा। पुर्विचि उत्पत्ति जालि देखा।*
*सुर्यप्रकाश विशेख। नेत्रांचा पै।। १०९।।*
*तेचि पुर्व जाणावि। जेथें जन्मलि पृथ्वी।*
*मनु उद्भवला स्वभावि। म्हणउनि पुर्वदिसा म्हणीजे।। ११०।।*
*दुसरें मुख तें उत्तरे। वामदेवो तो निर्धारें।*
*आप विवरेनि झरे। तये मुखींहुनि।। ११२।।*
*मयासि तेथे जन्म जालें। आपतत्व उपजलें।*
*ऐसे वामन (वामनदेव) मुख देखिलें। उत्तर दिसे।। ११४।।*
*तिसरें मुख अघोर। पछीम दिसा निर्धार।*
*चंद्र करूनियां आधार। स्छापियेलें लल्हाट।। ११५।।*
*त्वष्टिकु जन्मला ये स्छानिं। पश्चेम बोलिजे म्हणौनि।*
*ऐसें अघोर मुख जाणौनि। स्थापियेलें।। ११७।।*
*चौथे मुख ते दक्षेने। तत्पुरुष ऐसें जाण।*
*वायो तत्त्व देखने। दक्षिणेसि।। ११८।।*
*ये मुखीं जन्म सिलपिकु। तो महिंद्रवज्रभेदकु।*
*पर्वतछेदकु। देवरावो।। १२०।।*
*आतां पांचवें मुख जाणा। जयातें म्हणति इस्याना।*
*तेथें जन्मलें तत्व गगन। जाणावें निरुतें।। १२१।।*
*तेथें जन्म दैवज्ञु जाणा। यैसिं पांच तत्वें प्रमाण।*
*पंचमुखीं पंचभुतांसि अधीष्टाण। जाणावें निरुतें।। १२३।।*

असा पंचमुखांपासून पाच तत्त्वांचा आणि पाच आचार्यांचा उद्भव झाल्याचे विसोबांनी म्हटले आहे. ब्रह्माला त्यांनी 'विश्वकर्मकर्ता' (ओवी ३१७) म्हटले आहे. मनू, मय,

त्वष्टिक, शिल्पिक आणि दैवज्ञ हे पांचाळांच्या पाच जातींचे प्रवर्तक आचार्य ज्या अर्थी विसोबांच्या प्रतिपाद्य विषयात स्थान प्राप्त करतात आणि ब्रह्माला 'विश्वकर्मा' असे नाम लाभते, त्या अर्थी 'शिल्पशास्त्र' ग्रंथातून सूचित झालेला विसोबा आणि पांचाळ ज्ञाती यांचा अनुबंध हा निर्णायक ऐतिहासिकतेच्या पातळीवर येतो.

**पांचाळांची माहिती :**

श्री. गो. मं. कालेलकर यांनी एंथोव्हेनच्या आधारे 'मुंबई इलाख्यातील जाती'मध्ये पांचाळांविषयी पुढील माहिती नोंदविलेली आहे:[१९] "पांचाळ मुख्यत्वेकरून कर्नाटकात आणि दक्षिण महाराष्ट्रातील काही भागात आढळतात. म्हैसूर संस्थानात आणि मद्रास इलाख्यातही त्यांची संख्या बरीच आहे. पांचाळ हा शब्द 'पंच चाळ' म्हणजे 'पाच हुन्नर' ह्या शब्दावरून निघाला आहे, आणि त्यांत सोनार, सुतार, लोहार, तांबट आणि पाथरवट इतक्या शिल्पकारांचा समावेश होतो. ह्या सर्वही शिल्पकारांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो. पांचाळांशिवाय हे धंदे करणाऱ्या दुसऱ्या पाच स्वतंत्र जाती आहेत, त्यांचा आणि पांचाळांचा कोणत्याच प्रकारचा संबंध नाही.

"देवांचा शिल्पकार विश्वकर्मा याचे जे पाच पुत्र मनू, मय, त्वष्टा, शिल्पी आणि दैवज्ञ, त्यांजपासून आपली उत्पत्ती झाली आहे, असे पांचाळ सांगतात. त्यांच्यात सानक, सनातन, अहभुवन, प्रत्न व सुपर्ण अशी पाच गोत्रे आहेत. हे त्यांचे म्हणणे खरे दिसते. कारण जेव्हा जेव्हा त्यांच्या ब्राह्मणत्वाबद्दल वाद उपस्थित झाले आहेत, तेव्हा तेव्हा धर्मगुरूंनी त्यांच्याचतर्फे निकाल दिलेला आहे. ते ब्राह्मणांचे संस्कार पाळतात. त्यांचे उपाध्ये त्यांचेच ब्राह्मण असतात."

'शिल्पशास्त्रा'तील सुसंगत पुराव्याने हे उघड झाले आहे की, विसोबा खेचर हे शिवब्राह्मण होते- पांचाळांपैकी सोनार होते. कर्नाटकात आणि कर्नाटकाला लागून असलेल्या दक्षिण महाराष्ट्रात आधिक्याने आढळणारी ही पांचाळ ज्ञाती वीरशैव संप्रदायाचे अनुयायित्व स्वीकारून, आपल्या ज्ञातीला त्या संप्रदायातून तात्त्विक अधिष्ठान व पुराणप्रतिष्ठा देत होती.

**नामदेवांना बोधदान :**

ज्ञातिगत संस्कारांनी आणि गुरुपरंपरागत परमार्थविचारांनी शिवोपासनेची दृढता बाणवलेले विसोबा हे औंढ्याच्या प्रख्यात नागनाथमंदिरात राहत असत. ज्ञानेश्वर मंडळाने नामदेवांना 'निगुरा' म्हणून छेडल्यानंतर ते सद्‌गुरूच्या शोधार्थ निघाले, ते औंढ्याच्या नागनाथमंदिरात आले. विसोबा खेचरांची कीर्ती त्यांनी पूर्वी संतांच्या मेळयात ऐकली होती. विसोबा

शिवोपासक होते आणि औंढा हे शिवोपासनेचे एक महाकेंद्र होते. बारा ज्योतिर्लिंगांपैकी नागेशलिंगाचे ठाणे म्हणून साऱ्या भारतात ते गाजत होते. नामदेवांना हे स्थान बाळपणापासून परिचित होते. पंढरपूरपासून जरी ते दूर असले, तरी त्यांची मूलभूमी असलेल्या नरसीपासून अगदीच निकट होते. नामदेव नागनाथाच्या मंदिरात गेले, तो त्यांना तेथे एक विचित्र दृश्य पहायला मिळाले.

*देवावरी पाय ठेवूनि खेचर। निजेला परिकर निवांतचि।।*

या दृश्याने नामदेव विस्मयाकुल झाले. 'उठि उठि प्राण्या, आंधळा तूं काय?' असे ते तावातावाने म्हणू लागले. विसोबा स्वस्थ होते. त्यांनी 'देवावीण ठाव रिता कोठें?' असा नामदेवांना प्रतिप्रश्न केला आणि 'जेथें देव नसे, तेथें माझे पाय ठेवी।' असा आदेश दिला. या प्रश्नाने आणि त्याच्यामागोमाग प्रकटलेल्या निश्चयपूर्वक आदेशाने नामदेव हादरले. सारे विश्व त्यांच्याभोवती गरगरू लागले. ज्याने 'डोळियांचे डोळे उघडून' आनंदाचे लेणे लेवविले, त्याच्याविषयीच्या कृतज्ञतेने त्यांचे अंतःकरण भरून आले. त्यांचे जन्ममरणाचे साकडे फिटले. कैवल्य त्यांच्यापुढे उभे राहिले. औंढा येथे विसोबांनी 'श्रवणीं सांगितली मात, मस्तकीं ठेवियला हात.' आणि त्यानंतर द्वादशीच्या गावी (बार्शी येथे) त्यांनी नामदेवांना विस्ताराने उपदेश केला. सद्गुरूसंबंधी अंतरीची कृतज्ञता नामदेवांनी अनेकवार मुक्तपणे व्यक्त केली आहे:

*सद्गुरुनायकें पूर्ण कृपा केली।*
*निजवस्तु दाविली माझी मज।।*
*माझें सुख मज दावियेलें डोळां।*
*दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा।।*
*तया उतराई व्हावें कवण्या गुणें।*
*जन्मा नाहीं येणें ऐसें केलें।।*
*नामा म्हणे निकी दावियेली सोय।*
*न विसरावे पाय विठोबाचे।।*

नामदेवगाथ्यातील नामदेवचरित्रपर अभंगांत, नामदेवांना विसोबांनी केलेल्या बोधदानाची ही कथा रसभरित शब्दांत वर्णिलेली आहे.[१०] हे अभंग आत्मचरित्रात्मक असोत, की कोणा उत्तरकालीनाने रचलेले नामदेवचरित्रात्मक असोत, त्यांतील या घटनेचे हार्द परंपरेत सर्वमान्य आहे. 'नामयाचा खेचर दाता' हे सत्य नामदेवांच्या वाणीत उत्कट स्वरूपात व्यक्त झाले आहे. किंबहुना खेचरांच्या नावाचा जयकार त्यांच्या या भारतविजयी महान् शिष्यामुळेच आजवर घुमत राहिला आहे. ज्ञानदेवांमुळे जसा निवृत्तिनाथांचा कीर्तिडिंडिम अखंड झडत

राहिला आहे, अगदी तसाच नामदेवांमुळे विसोबांचा ज्ञानाधिकार गाजत राहिला आहे.

**औंढा नागनाथ : एक पाशुपत क्षेत्र :**

नामदेव-विसोबांच्या काळी आणि त्यांच्या चार-साडेचारशे वर्षे आधीही औंढे हे स्थान पाशुपतांचे आणि पाशुपतांशी जवळीक साधणाऱ्या शैवपंथीयांचे एक गाजते केंद्र होते. विशेषत: शैव संप्रदायाची मत्तमयूर शाखा याच ठिकाणी उदय पावली होती. या शाखेचे उदयस्थान म्हणून उल्लेखिले जाणारे दारुवन म्हणजे औंढ्याचाच परिसर होय. या शाखेतील आमर्दकतीर्थनाथ हा आचार्य आमर्दक मठाचा म्हणजे औंढे येथील मठाचा अधिपती होता. या आमर्दकतीर्थनाथाचा काळ इसवी सनाच्या आठव्या शतकाचा उत्तरार्ध होय. विसोबा-नामदेवांच्या काळीही येथे पाशुपतांचे विशेष प्रस्थ होते, असे मानायला आधार उपलब्ध आहेत. ज्ञानेश्वरीच्या रचनाकाळाच्या बरोबर एक शतक अगोदर या ठिकाणी रट्टवंशी बल्लाळ नामक शैवपंथीय राजा राज्य करीत होता. हा स्वत:ला 'आमर्दकपुरवरेश्वर' आणि 'नागेशपदाम्भोज-प्रसादधनगर्वित' या बिरुदांनी उल्लेखीत असे.[२१] याच बल्लाळाने नांदेड जिल्ह्यातील अर्धापूर नामक गावी कालामुख पाशुपत आचार्य ब्रह्मराशी याला मठाचार्यत्व प्रदान केल्याची नोंद त्याच्या एका लेखात (२ जानेवारी ११९१) आढळते.[२२] शके ११३९ च्या रांजणा (ता. वसमत, परभणी) येथील शिलालेखातही आमर्दकपूर आणि तेथील श्रीनागनाथ यांचा उल्लेख आहे.[२३] इसवी सनाच्या बाराव्या शतकात औंढ्याच्या परिसरात कालामुख पाशुपतांचे अनेक मठ नांदते-गाजते होते, असे तडखेल, करडखेल, सगरोळी, अर्धापूर, इत्यादी ठिकाणच्या कोरीव लेखांवरून स्पष्ट होते.[२४]

आमर्दकक्षेत्राचा म्हणजे औंढ्याचा परिसर पाशुपत शैवांनी व्यापलेला होता, यासंबंधीचे शिलालेखीय आधार विसोबांच्या काळाला जवळचे आहेत. याच संदर्भात 'लीळाचरित्रा'तील लीळा अत्यंत बोलकी आहे. ती लीळा अशी–[२५]

*'आमर्दक तपोधन। देवता अज्ञान। सर्वज्ञें म्हणीतलें।*
*एक एकातें पुसीलें। कांहोंतीं आवो छे।*
*आवंढे गांवीं। नागनाथ देवो।*
*उहांती आवो छे। 'आउंढें। गांव कीं नागनाथ देवो। कीं*
*नागनाथ गांव। आवंढे देवो। कीं आवंढे पाटण।*
*नागनाथ देवो।*
*कीं नागनाथ पाटण। आवंढे देवो।*
*नागनाथु चांडी कीं वीणा।*
*कोहन जान'। सर्वज्ञें म्हणीतलें।*

*'बारा वरीखें क्षेत्र-संन्यासु घेतला।*
*परि जीए देवतेचि उपास्ति करी। तीएचें नांवही नेणें।'*

चक्रधरांनी गुजराती संवादातून निवेदिलेली ही लीळा आमर्दक क्षेत्री बारा वर्षे तप करणाऱ्या शैव तपस्व्याच्या अज्ञानाची टर उडविणारी असली, तरी तिच्यातून सूचित होणारी शैवांसंबंधीची वस्तुस्थिती प्रस्तुत संदर्भात उपयुक्त आहे. औंढा येथे तप करणाऱ्याला लीळाचरित्रकाराने 'आमर्दक तपोधन' म्हटले आहे. या संज्ञेचा अर्थ 'आमर्दक क्षेत्रातील पाशुपत-संप्रदायी साधू' असा होतो. तपोधन ही पाशुपत संप्रदायाच्या विशिष्ट अनुयायांची पारिभाषिक संज्ञा आहे. 'कालमुखतपोधनाग्रगण्य' (गणेशवाडी लेख), 'तपोधन' ( तडखेल, करडखेल लेख), इत्यादी नोंदी या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत.[२६]

'लीळाचरित्रा'त उल्लेखिलेला 'आमर्दक तपोधन' हा बारा वर्षे तप करीत होता. बारा वर्षे तप म्हणजे पाशुपत संप्रदायात प्रसिद्ध असलेली 'द्वादशाब्दी शैवी दीक्षा' होय. हरिभद्रसूरी आणि राजशेखरसूरी यांनी आपल्या 'षड्दर्शनसमुच्चया'मध्ये पाशुपतांच्या या 'शैवी दीक्षे'बद्दल पुढील श्लोक दिला आहे:[२७]

*शैवी दीक्षा द्वादशाब्दी सेवित्वा योऽपि मुंचति।*
*दासी दासोऽपि भवति सोऽपि निर्वाणमृच्छति।।*

(बारा वर्षांच्या शैवी दीक्षेचे जो पालन करतो, तो दास असला, तरी निर्वाण प्राप्त करतो.)

यावरून आमर्दकक्षेत्र म्हणजे औंढे नागनाथ आणि तेथील पाशुपतांचे वर्चस्व आपल्या ध्यानी येईल.

**तपोधन आणि भरटक :**

आमर्दकक्षेत्रातील 'तपोधना'च्या निमित्ताने थोडे विषयांतर करून, महाराष्ट्रातील एका पाशुपत संप्रदायाच्या जातीबद्दल येथेच विचार करायला हवा. गुजरातेत आजही 'तपोधन' नावाची एक कनिष्ठ मानली जाणारी ब्राह्मण पोटजात आहे. हे 'तपोधन' गुजरातभर पसरलेले असून, शिवमंदिरात पुजाऱ्याचे काम करतात. त्यांच्याकडे पौरोहित्याचे काम नसते. या 'तपोधनां'नाच लोक 'भरडा' या नावानेही ओळखतात.[२८] 'भरडा' हा शब्द 'भरटक' या सांप्रदायिक संज्ञेचा अपभ्रंश होय.

हे 'तपोधन' अथवा 'भरटक' एके काळी पाशुपत शैव संप्रदायाची दीक्षा घेतलेले लोक होत, हे उघड आहे. कारण तपोधन ही जशी पाशुपतपंथीयांसाठी विशिष्ट संज्ञा आहे, त्याचप्रमाणे 'भरटक' हीही तशीच विशिष्ट संज्ञा आहे. हरिभद्रसूरीने पाशुपतांविषयी माहिती

देताना 'षड्दर्शनसमुच्चया'त असे म्हटले आहे की[२९]–

*तेषां सर्वतीर्थेषु भरटा एव पूजकाः।*
*तेषामन्तर्भेदा भरट-भक्त-लैङ्गिक-तापसादयो भवन्ति।*
*भरटादीनां व्रतग्रहणे ब्राह्मणादिवर्णनियमो नास्ति।*
*यस्य तु शिवे भक्तिः स व्रती भरटादिर्भवेत्।*

(पाशुपतांच्या सर्व तीर्थांत भरटक हे पूजक म्हणून काम करतात. भरट, भक्त, लैंगिक आणि तापस इत्यादी त्यांचे अंतर्भेद आहेत. भरटादींना व्रतग्रहणाच्या बाबतीत ब्राह्मणादी वर्णबंधन नसते. ज्याची शिवाच्या ठायी भक्ती असेल, असा कोणताही व्रती भरटादी बनू शकतो.)

राजशेखरसूरीने आपल्या 'षड्दर्शनसमुच्चयात'त हरिभद्राप्रमाणेच भरटांविषयी विधान केले आहे.[३०] तो म्हणतो–

*भरटानां व्रतादाने वर्णव्यक्तिर्न काचन।*
*यस्य पुनः शिवे भक्तिर्व्रती स भरटो भवेत्।।*

(भरटांच्या व्रतग्रहणाच्या बाबतीत कोणतेही वर्णबंधन नसते. ज्याची शिवाच्या ठायी भक्ती असेल, असा व्रती भरट बनू शकतो.)

'प्राकृतशब्दमहार्णवा'मध्ये भरटकांना 'शिवभवनाधिकारी भरटक' (शिवभवनाहिगारी भरडअ') म्हटले आहे,[३१] ते हरिभद्र व राजशेखर यांनी दिलेल्या माहितीशी सुसंवादीच आहे.

गुजरातेतील आजचे तपोधन ब्राह्मण अथवा भरडा हे जसे पाशुपतपंथीय तपोधनांचे आणि भरटकांचे अवशेष होत, त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील भैरवोपासक नाथपंथीय भराडी हेही प्राचीन भरटकच होत. इसवी सनाच्या तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत पश्चिम आणि दक्षिण भारतात अत्यंत प्रभाव गाजवणारा पाशुपत संप्रदाय हा पुढे नव्या संप्रदायांच्या आगमनाने निष्प्रभ ठरला आणि त्या संप्रदायांचे अनुयायी आपल्या मठमंदिरांसह नाथ, वीरशैव इत्यादी नवसंप्रदायांत विलीन झाले. महाराष्ट्रातले भराडी हे समूहाने पाशुपत संप्रदायातून नाथ संप्रदायात प्रविष्ट झालेले दिसतात. मराठी ग्रामीण जीवनातील धर्मकारणात अस्तित्वात असलेला भराडी हा एके काळी महाराष्ट्रभर पसरलेल्या पाशुपत संप्रदायाचा परिवर्तित स्वरूपातील (नाथपंथी बनलेला) पुरावाच होय.

विषयांतराचा दोष पत्करूनही हा एवढा विस्तार केला, तो विसोबाकालीन महाराष्ट्रात

असलेले पाशुपतांचे प्रभुत्व स्पष्ट व्हावे, म्हणूनच. नामदेवांनी औंढ्याचे नागनाथमंदिर फिरविल्याची जी चमत्कारिक कथा आहे, त्या कथेचा उगम पाशुपतांची शिवमंदिरे पार्श्वद्वारयुक्त असतात, या वस्तुस्थितीच्या अज्ञानातूनच झालेला आहे.[३२]

**विसोबांची स्फुट रचना :**

विसोबांच्या नावावर जे आठ-दहा अभंग आढळतात, त्यांतील बहुतेक अभंग हे विसोबा नामदेवांना उद्देशून बोलताहेत, अशा थाटाचे आहेत: म्हणजेच ते नामदेवांच्या चरित्राख्यानाचे निखळलेले सुटे घटक आहेत, असे वाटते. त्यांपैकी जे दोन-चार अभंग विसोबांच्या प्रामाणिक रचनेत मोडतील, त्यांतील एक अभंग त्यांच्या शिवभक्तीवर व त्यांना अभिप्रेत असलेल्या शिवस्वरूपावर प्रकाश टाकणारा आहे. तो अभंग असा:

*मुळु वदनांचा अंगुळु हातांचा।*
*उदानु नेत्रांचा स्वामी माझा।।*
*मुगुट जयाचा केवल्या आगळै काटी।*
*पवित्रु तळवटीं चरण ज्याचे।।*
*पोकु ते भागले, शेली वेडावले।*
*अंगुळुभंगी झाले थक्कितया।।*
*ढकारु वदनांचा आला वर्णावया।*
*जिव्हा चिरलिया न कळे त्यासी।।*
*सद्‌भावें शरण आवारु जोडुनी।*
*खेचर विसा चरणीं विनटला।।*

विसोबांच्या उपरिनिर्दिष्ट अभंगात त्यांना अतीव प्रिय असणाऱ्या शिवाचे वर्णन आहे : "पाच मुखांचा, दहा हातांचा आणि तीन नेत्रांचा माझा स्वामी आहे. ज्याच्या मुकुटी एकवीस स्वर्ग आहेत आणि चरणतळवटी सप्तपाताळे आहेत, ज्याचे स्वरूप वर्णिताना चार वेद, सहा शास्त्रे आणि अठरा पुराणे थकित झाली, तसेच हजार जिभांचा शेष ज्याला वर्णावयाला आला, पण त्याच्या जिव्हा चिरल्या, अशा त्या शिवाला मी दोन्ही हात जोडून सद्‌भावाने शरण आलो आणि त्याच्या चरणी विनटलो आहे."

विसोबांनी वर्णिलेले हे शिवस्वरूप पंचमुख शिवाचे आहे. पंचमुख शिव हा विसोबापूर्व शैव संप्रदायांत केवळ भक्तीच्या पातळीवरून उपास्य ठरलेला होता, एवढेच नव्हे, तर तो त्यांच्या तत्त्वज्ञानातील सृष्ट्युत्पत्तिप्रक्रियेचे प्रतीक ठरलेला होता. पंचमुख शिवाचा 'पंचब्रह्म' हा पर्याय शैव संप्रदायांत वारंवार वापरलेला आढळतो. पूर्वनिर्दिष्ट 'शिल्पशास्त्र' या ग्रंथात

'पंचब्रह्म' या संज्ञेचे उपयोजन अनेकदा झाल्याचे सांगितलेच आहे.

हा अभंग विसोबाविषयक चर्चेत नेहमीच उद्धृत केला जाणारा आहे. हा नंदभाषेतील मूळ गूढ वाटणारा अभंग असून, विसोबा सराफीचा व्यवसाय करीत असल्यामुळे त्यांनी मुद्दाम व्यापाऱ्यांत रूढ असणाऱ्या गूढ संख्यासंकेतांत तो लिहिला आहे, असे म्हटले जाते. खरे म्हणजे या अभंगात शिववर्णनासाठी जे गूढ संख्यासंकेत वापरले आहेत, असे सांगितले जाते, ते गूढ नसून परभाषेतील संख्यावाचक शब्द आहेत. ते सर्व शब्द कानडी आहेत. विसोबा हे पांचाळ ज्ञातींपैकी सोनार असल्यामुळे, ते कदाचित् त्या ज्ञातांच्या मूलभूमीतून म्हणजे कर्नाटकातून महाराष्ट्रात स्थायिक झालेल्या घराण्यांपैकी असतील. दुसऱ्या भाषाप्रदेशात येऊन राहिलेले लोक आपापल्या समाजातील व्यवहारात, अन्यभाषिकांसमक्ष बोलताना काही गोष्टी गुप्त राखावयाच्या असतील तर, मुद्दाम आपल्या भाषेतील (इतरांना न कळणारे) शब्द वापरतात. नंदभाषा म्हणून व्यापाऱ्यांत प्रचलित असलेली संख्यासंकेतांची ही गूढ समजली जाणारी भाषा म्हणजे कानडी व्यापाऱ्यांच्या महाराष्ट्रातील व्यवहाराची भाषा होय, हे यावरून आपल्या लक्षात येईल.

**वटेश्वर पंचमुखी शिव :**

विसोबांच्या अभंगात आढळणारा 'मुळु वदनांचा स्वामी' हा त्यांच्या 'षट्स्थल' ग्रंथात तर सर्वत्र भरलेला आहे. आता त्याच्या अंतरंगात शिरताना विसोबांना परमाराध्य असलेला आणि त्यांच्या अभंगातून आपणांस नुकताच परिचित झालेला पंचमुख शिव प्रथमारंभीच दर्शनाचा विषय केला, तर ते औचित्याचेच ठरेल.

विसोबांनी ग्रंथारंभी गणेशनमन केल्यानंतर, त्यांच्यावर प्रसन्न झालेला गणेश त्यांना म्हणाला : 'तुज दृश्य असे वटेशु। तोचि पै महेशु। अस्तवि पां।' (१.२७) तरीही त्यानंतर त्यांनी शारदा आणि सद्‌गुरू यांना वंदन केले. परंतु पुढे सद्‌गुरूनेही गणेशाप्रमाणेच वटेशवंदनाचा आदेश दिला. हा आदेश शिरोधार्य मानून विसोबांनी पंचेचाळीस ओव्यांमध्ये (१.१०६-१५०) त्यांच्या परमाराध्याचे– वटेश्वर शिवाचे अत्यंत उत्कट भक्तिभावाने वर्णन केले. विसोबा म्हणतात:

*नमन जी तुम्हां वटेश्वरा। तुं करीता या चराचरा।*
*ब्रह्मादिक आकारा। आणिले देखा।। १०६ ।।*
*असा तुं जी वटेसु। चंद्र सूर्य तुझा प्रकाशु।*
*दश दिशा हा विकाशु। पंचवगत्रांचा।। १०७ ।।*

*तुझी जीं ये पंचवगत्रें। ते मिर्वर्ति पै स्वतंत्रें।*
*तेथें जन्मलीं भुतमात्रें। पंचतत्वें।। १०८।।*

वटेश्वर शिव हा चराचराचा कर्ता आहे. ब्रह्मादिक देव त्यानेच आकाराला आणले; चंद्र-सूर्य त्याच्यामुळे प्रकाशित आहेत आणि पंचतत्त्वांचा हा विस्तार त्याच्याच पंचमुखांपासून झालेला आहे, हे विसोबांनी गाइलेले वटेश्वराचे महिम्नस्तोत्र त्यांच्या उपासनेतील व विचारविश्वातील शिवस्वरूपाचे द्योतक आहे. त्यांचा वटेश्वर हा पंचानन शिव आहे, हे उघड आहे. वटेश्वर शिवाच्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष आणि ईशान या पाच मुखांपासून पंचभूतांचा विस्तार कसकसा झाला, याचे विस्तृत वर्णन विसोबांनी १०९ ते १२३ या पंधरा ओव्यात करून–

*असा पंचमुषि विस्तारु। विस्तारला असे इश्वरु।*
*तोचि तो स्वयें संकरु। प्रगटला।। १२४।।*

असा वटेश्वर-स्वरूप-वर्णनाचा उपसंहार केला आहे.

विसोबांना हे वटेश्वररूपी निधान त्यांच्या परंपरेतूनच लाभले होते. वटेश्वर हे त्यांच्या परमगुरूचे परमाराध्य होते. चांगदेव हे वटेश्वररूपच बनलेले असल्यामुळे त्यांनी वटेश्वराची नाममुद्रा आपल्या नावाशी निगडित केली होती. चांगा वटेश्वर या त्यांच्या नावात वटेश्वर शिव कायमचा विसावला आहे. त्यांनी आपल्या 'तत्त्वसार' नामक ग्रंथात 'पंचभूतिकोत्पत्ति' हा विषय मांडताना वटेश्वराच्या पंचमुखांपासून पंचभूतांची उत्पत्ती झाली, असे विवरण केले आहे.[३३]

*आतां पंचभूतिकोत्पत्ति। यांचि सांधैन वित्पत्ति।*
*एक एकाप्रति। जन्म जाले।। ६३०।।*
*ईशान म्हणिजे आकाश। वायु म्हणिजे तत्पुरुष।*
*अघोर तेज, प्रकाश। वामदेव म्हणिजे।। ६३१।।*
*पृथ्वी सद्योजातापासौनि। असे पंचब्रह्मीहोउनि।।*
*येणेंचि अनुक्रमें गगनिं। विलयो पावे।। ६३२।।*

(येथें 'तेज' ऐवजी 'आप' हवे.)

विसोबांनी केलेले वटेश्वरवर्णन चांगदेवांच्या या शिवस्वरूप वर्णनातून स्फुरलेले आहे आणि ते त्यांच्या परंपरेतील शिवकल्पनेशी संवादी आहे. चांगदेवांनी 'पंचब्रह्म' या संज्ञेचा स्पष्टपणे उपयोग केला आहे.

**'पंचमुख' विश्वकर्मा आणि चांगदेव :**

'षट्स्थल' व 'तत्त्वसार' या दोन ग्रंथांत पंचमुख शिवाच्या वर्णनाच्या बाबतीत असलेले अद्‌भुत साम्य आणि 'शिल्पशास्त्र' व 'षट्स्थल' या दोन्ही ग्रंथांतील प्रमाणांनी सिद्ध होणारे विसोबा खेचरांचे पांचालत्व यांचा विस्तृत विचार आपण केलेला आहे. या पार्श्वभूमीवर आणखी एका लघुकृतीचे महत्त्व मला विशेष जाणवले आहे. ही लघुकृती म्हणजे 'महासिद्ध चांगदेव महाराजकृत विश्वकर्म्याची आरती' होय. ही आरती मला पुण्यातील एक प्रसिद्ध सुवर्णकार श्री. अनंत रामचंद्र भुरके यांच्याकडून उपलब्ध झाली:

*जय देव जय देव जय विश्वकर्मा।*
*आरती ओवाळूं तुज पुरुषोत्तमा।। ध्रु.।।*

*अधिक माघ मास शुक्ल त्रयोदशी।*
*प्रातःकाळीं भीमातीरीं तूं प्रगटसी।।*
*पंचमुख, दशभुजीं आयुधें शोभतीं।*
*पीतांबरधारी, पंच मुकुट झळकती।। १।।*

*सकल देवांमाजीं अगाध तुझी करणी।*
*सृष्टि उत्पन्न करिसी तूं परम खाणी।*
*तुझें नाम स्मरतां संकट निवारी।*
*सकळांही मोक्ष देसी, तूं परम तारी।। २।।*

*पुंडलिकासन्निध विश्वज्ञ लोहतीर्थ।*
*तेथें तव चरणीं येतीं सकळही तीर्थें।।*
*चांगदेव म्हणे तूं कृपासागरा।*
*आरती ओवाळूं तुज विश्वंभरा।। ३।।*

विसोबांप्रमाणेच चांगदेवांनीही वटेश्वराला पंचमुख स्वरूपातच ध्याइले आहे आणि त्याच्या पाच मुखांपासून 'पंचभूतिकोत्पत्ती' झाल्याचे म्हटले आहे; त्या चांगदेवांनीच पंचमुख विश्वकर्म्याची आरती रचावी, याला प्रस्तुत संदर्भात विशेष महत्त्व आहे, हे आपल्या ध्यानी येईलच. विसोबांच्या जीवनात ज्याप्रमाणे 'पंचमुख' विश्वकर्मा आणि 'पंचमुख' शिव एकरूप होऊन नांदतांना दिसतात, त्याचप्रमाणे त्यांचे ऐक्य विसोबांचे परमगुरू चांगा वटेश्वर यांच्याही जीवनात घडलेले होते, असे या आरतीवरून दिसते. या आरतीत विश्वकर्म्याचे प्रकटीकरण भीमेच्या तीरीं पुंडलिकाजवळ लोहतीर्थात घडले, असे म्हटले आहे.

**चोवीस भुजांचा गणेश :**

विसोबांच्या वटेश्वरस्वरूपाप्रमाणेच त्यांच्या गणेशाचे स्वरूपही अभ्यसनीय आहे. 'षट्स्थला'च्या मंगलाचरणातील पहिल्या २४ ओव्या गणेशवंदनाला आणि गणेशस्वरूपवर्णनाला वाहिलेल्या आहेत. गणेशाला विसोबांनी विघ्नहर, एकदंत, गणपती, नरकुंजर, विनायक, गजानन, विकटरूप, सहजरूप, इत्यादी नामांनी बाहिले आहे. एवढेच नव्हे, तर त्याला वटेश्वराप्रमाणेच शंकर आणि पंचमुख असेही म्हटले आहे. म्हणजे विसोबांच्या हृत्कोशात वटेश्वर आणि गणेश एकरूपच आहेत.

विशेष म्हणजे विसोबांचा हा विघ्नहर गणेश चार नव्हे, सहा नव्हे, दहा नव्हे, तर चोवीस भुजा धारण करून प्रकटलेला आहे–

*नमन गजानना। सोभति चोविस भुजा जाना।*
*मिर्वति अयुध्यें प्रमाण। करुणाकरा।। ७।।*

असे चोवीस भुजांच्या गणेशाला नमन करून विसोबा त्याचे स्वरूपवर्णन पुढील सात ओव्यांत करीत आहेत–

*फरस कमळ करीं। पाश अंकुश धरी।*
*खांडे भक्षितु करिं। येके करिं लाडू देखा।। १२।।*
*येके करिं येक्षमाळा। दुजे करिं शिशाळा।*
*येके करिं त्रिशुळा। येके करिं डउर देखा।। १३।।*
*येके करिं धनुशे असे। दुजा करिं बाण कैसें।*
*येके करिं अंकुश दिसे। येके करिं साटू।। १४।।*
*येके करिं कपाळुं। दुजा करिं मुद्गल सोहज्वळु।*
*सर्वांगिं विभुति निर्मळ। सोभति असे।। १५।।*
*येके करिं गदा। दुजे करिं कासि असे सदा।*
*येके विघ्नातें यौध्या। संग्राम करिं।। १६।।*
*येकु कटिं ठेविला देखा। दुजयानि थापिला आइका।*
*येक करु मुक्तिदायका। ऐसे जाणावे।। १७।।*
*वैकुंठवाट दावि एकु। यैसा भुजांचा विशेखु।*
*चोविसां हस्तिं विनायेकु। मिर्वत असे।। १८।।*

येथे गणेशाच्या चोवीस हातांतील आयुधांचा अथवा हातांच्या मुद्रांचा जो तपशील दिलेला आहे, तो अपूर्ण आहे आणि काहीसा सदोषही आहे. परशू, कमळ, पाश, अंकुश,

खांडे, लाडू, अक्षमाळा, शिर (शिशाळा), त्रिशूळ, डमरु, धनुष्य, बाण, कपाळ, मुदगल, साटू (?), गदा, कासी (काशीफळ?) या सतरा आयुधांची नोंद ठीक आहे. अंकुश हा पुनः एकदा नोंदविला आहे. म्हणजे अठरा हातांतील आयुधांचा तपशील पूर्ण झाला. उरलेल्या सहा हातांपैकी एक विघ्नाशी युद्ध करीत आहे, एक कटीवर ठेवलेला आहे, एक 'थापिला' आहे (?), एक भक्तांना मुक्तिदान करीत आहे आणि एक वैकुंठवाट दावीत आहे. आणखी एका हाताचे वर्णन करावयाचे राहून गेले आहे.

असा हा चोवीस भुजांचा विनायक भारतीय मूर्तिसंभारात आणि मूर्तिशास्त्रीय वाङ्मयात कोठे आहे, याचा शोध घेतला पाहिजे. नागपूर विद्यापीठातील प्रा. म. शं. वाबगावकर यांनी पुरविलेल्या माहितीनुसार चोवीस भुजांचा गणेश विदर्भातील रामटेक क्षेत्री आहे. विसोबांचा हा चोवीस भुजांचा गणेश जसा 'शंकर' आणि 'पंचमुख' आहे, तसाच सर्वांगी चर्चिलेल्या निर्मळ विभूतीने शोभत आहे, हेही पाहण्यासारखे आहे. वटेश्वरात आणि गणेशात विसोबा भेद पाहत नाहीत.

**गुरुमुख आणि मनमुख :**

गोरक्षनाथादी परंपरेतून विसोबांना जो वारसा लाभला, त्याचे प्रकटीकरण 'षट्स्थला'तील प्रतिपादनात जागोजाग आढळते. 'षट्स्थला'तील गुरुमुख आणि मनमुख यांविषयीचे विवेचन हे त्या वारशाचेच एक स्पष्ट चिन्ह आहे. साधकाच्या वृत्तीच्या आणि प्रगतीच्या संदर्भात गुरुमुख आणि मनमुख या दोन संज्ञा वापरलेल्या आहेत. गुरुमुख म्हणजे मनाचे स्थैर्य आणि परमार्थोन्मुखता. मनमुख म्हणजे विषयोन्मुखता. चांगल्या साधकाने गुरुमुख असावे, मनमुख असू नये, असा विसोबांचा सांगावा आहे.

*हे जाणिजे गुरुमुखें। तरीच साक्षात्कारें वोळखे।*
*मनमुखें जो देखे। तो पशूसमान।।१.१८७*

असे सांगून त्यांनी गुरुमुख-मनमुखाचे स्वरूप क्रमाने विशद केले आहे–

*मन वोळखिलें सावेव। मग तुच्छ वाढती देहभाव।*
*ऐसिया नांव सर्वथैव। तेंचि गुरुमुख।।*
*देहींचें चंचळपण निमालें। मन-इंद्रियांसी साम्य जालें।*
*ऐसिया नावं बोलिलें। गुरुमुख देखा।।*
*हें शिवागमींचें ज्ञान। साक्ष सिद्धांतयोग जाण।*
*पिंडब्रह्मांडासी प्रमाण। श्रीगुरुमुख।।*
*ऐसें तें देखा गुरुमुख। वाचेसि शब्दातीत देख।*
*स्वानुभवें तें वोळख। श्रीगुरमुखें।। १.१९०-१९३*

या परमार्थोन्मुख अवस्थेच्या अगदी विरुद्ध अवस्था मनमुख ही होय. ज्यामुळे 'विश्व भांबावले ठकले', त्याला मनमुख म्हणावे, असा प्रस्ताव करून विसोबा मनमुखाचे वर्णन असे करतात–

*बोलेंचि बोले धीटपाठ। लटकीचि करी खटपट।*
*स्वयंज्ञानाची नाहीं वाट। तें मनमुख।।*
*शब्दचातुर्यविवरणा। शास्त्रपठण अनुमाना।*
*निश्चयासी स्वयंज्ञान नाहीं जाणा। तें मनमुख।। १.२०४-०५*

अशा प्रकारे कण सांडून भुशात रमण्याची ही बहिर्मुखता ज्यांच्या ठायी आहे, त्यांची परवड काय विचारावी? त्यांना प्रपंचात विषयांचा वरचष्मा सोसावा लागतो आणि परमार्थातील अधिकाराला मुकावे लागते–

*जे जे मनमुख असती। तयांच्या मना नाहीं विश्रांती।*
*ते कवणें परी पावती। या शडुस्थळासी।।*
*जयांसी मनमुखें अहंकारु। तयांसी दुरी ठेला ईश्वरु।*
*नाहीं शडुस्थळीं अधिकारु। बोलेंचि कवणे परि होये।। १.२०७-०८*

गुरुमुख आणि मनमुख या संज्ञा सिद्धांच्या संप्रदायातील आहेत. सिद्धवाणीत त्यांचा आढळ वारंवार होतो. डॉ. नागेंद्रनाथ उपाध्याय यांनी 'नाथ और संत साहित्य' या विवेचक ग्रंथात सिद्धांच्या आणि नाथांच्या वाणीत वापरल्या जाणाऱ्या या संज्ञांची आशयकक्षा विस्ताराने विवेचिली आहे : "योगसाधनेच्या क्षेत्रात अग्रेसर होण्यासाठी मनमुखाचा त्याग करून गुरुमुखाचे आश्रयग्रहण करायला हवे," असा सिद्धांचा आणि नाथांचा आग्रह असल्याचे त्यांनी दाखविले आहे.[३४] 'गोरखबानी'त गुरुमुख ही संज्ञा अनेक ठिकाणी वापरलेली दिसते:[३५]

*प्यंड परचानै गुरुमुषि जोई।*
*बाहुडि आवागवन न हाई।।*
*जे असा तो आपदा जे संसा तो सोग।*
*गुरुमुखि बिना न भाजसी ये दून्यो बडरोग।।*

"निर्वाणपदाचा परिचय पिंडातूनच गुरुमुखवृत्तीने प्राप्त होतो आणि जन्ममृत्यूची येरझार चुकते. जे वासना आणि संदेह बाळगतात, त्यांना आपदा आणि शोक सहावे लागतात. गुरुमुखावाचून हे दोन मोठे रोग अंतरातून हटत नाहीत," हा गोरक्षनाथांचा सांगावा परंपरेने विसोबांपर्यंत पोचला आहे. विसोबांचे शिष्य नामदेवही 'गुरुमुखा'च्या भाषेत आपला परमानुभव

व्यक्त करताहेत–

*आम्हां मरण नाहीं, मरशील काई।*
*आत्मवस्तु पाहीं श्रीगुरुमुखें।। (अ. १५१)*
*भक्ति हेचि भावें परब्रह्म पक्वान्न।*
*गुरुमुखें जेवण जेवीयेलें।। (अ. १५८)*
*गुरुमुखें स्नान करी, परब्रह्मीं लक्ष धरी।*
*अनुहत ध्वनी थोरी नाद गर्जे।। (अ. २०९४)*

पंजाबात नामदेवांच्या पाऊलखुणांचा मागोवा घेत शुद्ध परमार्थ जागविणाऱ्या नानकांनी तर आपल्या 'सिद्धगोष्ठी' मध्ये जवळजवळ पंचवीस पदांमध्ये गुरुमुख-मनमुखाची चर्चा केली आहे.[३६] त्यांच्या मते गुरुमुख हा मुक्तात्मा असतो, तसेच शाश्वत शांतीचा व मोक्षाचा आनंद लुटतो; तर मनमुख हा आपल्या वासनांनी बद्ध असतो व सदैव जन्ममरणाच्या चक्रात अडकून रहातो–

*घटि घटि गुपता गुरुमुखि मुक्ता।*
*अंतरि बाहरि सबदिसु जुगता।*
*मनमुखि बिनसे आवे जाइ।*
*नानक गुरुमुखि साचि समाइ।। १३।।*

**विसोबा आणि षट्स्थल सिद्धान्त :**

आपण प्रारंभी विसोबांच्या 'षट्स्थल' या ग्रंथाचा बहिरंगपरिचय विस्ताराने करून घेतला आहेच. त्या परिचयावरून हे पुरेसे स्पष्ट झाले आहे की, विसोबांच्या प्रस्तुत ग्रंथाचे नाव त्याच्या प्रतिपाद्याचे साक्षात् द्योतक असून, त्यात वीरशैवांचा षट्स्थल सिद्धान्त विवरिलेला आहे. माझ्या अध्ययनकक्षेच्या दृष्टीने या ग्रंथातील प्रतिपाद्याचे विश्लेषण मुळीच आवश्यक नाही. माझी अध्ययनकक्षा 'षट्स्थला'च्या उपलब्धीच्या निमित्ताने यादवकालीन मराठी वाङ्मयाच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीचे पुनरवलोकन करणे एवढीच मर्यादित असल्यामुळे, विसोबांनी वीरशैवांचा षट्स्थल सिद्धान्त हा आपल्या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय केला आहे, एवढी वस्तुस्थिती माझ्या अध्ययनाला गती देण्यास पुरेशी आहे. 'षट्स्थला'ची समग्र संहिता अभ्यासकांना उपलब्ध होत असल्यामुळे, यादवकालीन मराठी वाङ्मयाची तत्त्वज्ञानदृष्ट्या तपासणी करणारांची सोय झालेलीच आहे. ते ती करतीलच.

तसेच वीरशैवांचा षट्स्थल सिद्धान्त हाही आजवर कन्नड आणि इंग्रजी भाषांमध्ये विस्ताराने विवरिला गेला आहे. षट्स्थल सिद्धांन्ताची मांडणी करणारी कन्नड साधने मराठी

अभ्यासकांना सहजगम्य नसली, तरी सोलापूरच्या रावसाहेब वारदांनी अनेक संस्कृत ग्रंथ मराठी अनुवादासह प्रकाशित करून, वीरशैव आचार-विचार मुळातून समजावून घेण्याची सोय उपलब्ध करून ठेवलेली आहे. विशेषतः मायिदेवांचे 'अनुभवसूत्र', स्वप्रभानंदांची 'शिवाद्वैतमंजरी', मरितोंटदार्यांचे 'कैवल्यसार' आणि शिवयोगिशिवाचार्यांचा 'सिद्धान्तशिखामणि' हे संस्कृत ग्रंथ षट्स्थल सिद्धान्ताची मांडणी समजून घेण्यास नितांत उपकारक आहेत. निजगुण शिवयोगींच्या 'विवेकचिंतामणी'ला विस्तृत मराठी ओवी-वेष चढविणाऱ्या शांतलिंगस्वामींनी तर वीरशैव विचारविश्व मराठी जनांनाही खुले केले आहे. या ग्रंथाचे संपादक डॉ. पंडित आवळीकर यांनी आपल्या विस्तृत अभ्यासपूर्ण प्रस्तावनेत षट्स्थल सिद्धान्ताचा नीटस परिचय घडविला आहे.[३७] डॉ. आवळीकरांच्या विवरणाचा मागोवा घेत षट्स्थल सिद्धान्त संक्षेपाने असा सांगता येईल :

षट्स्थल सिद्धान्ताचे वीरशैव तत्त्वज्ञानात एवढे महत्त्व आहे की, वीरशैव तत्त्वज्ञानाला 'षट्स्थल सिद्धान्त' असेच नाव लाभले आहे. 'षट्स्थल' या संज्ञेतील 'स्थल' याचा अर्थ ब्रह्म असा आहे. जेथे सर्व विश्व स्थिर होते व लय पावते ते ब्रह्म म्हणजे स्थल. स्थलाचे मुख्य भेद दोन : लिंगस्थल व अंगस्थल. लिंगस्थल म्हणजे शिव आणि अंगस्थल म्हणजे जीव. जीव-शिवांचे म्हणजेच लिंगांगांचे ऐक्य 'लिंगांगसामरस्य' या संज्ञेने निर्देशिले जाते. लिंगांगसामरस्य हे वीरशैवांचे परम ध्येय होय.

प्रारंभीच्या अवस्थांत लिंग व अंग यांच्यामध्ये भेद अथवा द्वैत असले, तरी अंतिम अवस्थेत पूर्ण अभेद अथवा अद्वैत निर्माण होत असल्यामुळे हे तत्त्वज्ञान भेदाभेदात्मक अथवा शिवाद्वैतात्मक म्हटले जाते. शिव हा शक्तिविशिष्ट मानला गेल्यामुळे या तत्त्वज्ञानाला 'शक्तिविशिष्टाद्वैत' असेही नाव लाभले आहे.

स्थल म्हणजे ब्रह्म हे लिंग (शिव) व अंग (जीव) असे द्विविध होते, त्याचप्रमाणे शक्ती ही कला व भक्ती अशी द्विविध होते. यांपैकी कलाशक्ती लिंगाचा आणि भक्तिशक्ती अंगाचा आश्रय घेते. कला जीवाला बद्ध करते, तर भक्ती त्याला मुक्त करते.

यापुढे लिंगस्थलाचे भावलिंग, प्राणलिंग व इष्टलिंग असे तीन प्रकार होतात आणि त्या प्रत्येकाचे दोन-दोन भेद होऊन त्यांची संख्या महालिंग, प्रसादलिंग, चरलिंग, गुरुलिंग, शिवलिंग व आचारलिंग अशी सहा होते. कलाशक्तीतून अनुक्रमे चिच्छक्ती, पराशक्ती, आदिशक्ती, ज्ञानशक्ती, इच्छाशक्ती व क्रियाशक्ती अशा सहा शक्ती निर्माण होतात आणि त्यांचा वरील सहा लिंगांशी याच क्रमाने संबंध जोडला जातो.

अंगस्थलाचे त्यागांग, भोगांग व योगांग हे तीन भेद आणि त्यांची प्रत्येकी दोन-दोन प्रमाणे भक्तस्थल, महेशस्थल, प्रसादीस्थल, प्राणलिंगीस्थल, शरणस्थल व ऐक्यस्थल अशी

सहा स्थले होतात. भक्तिशक्तीतून उद्‌भवलेल्या सद्‌भक्ती, नैष्ठिकी शक्ती, अवधानशक्ती, अनुभवशक्ती, आनंदशक्ती व समरसशक्ती या सहा शक्तींचा वरील षड्‌विध अंगस्थलांशी याच क्रमाने संबंध येतो. हे अंगस्थलांचे विश्लेषण वाढता वाढता त्यांचे १०१ सूक्ष्म भेद सांगितले आहेत. जीवाची शिवाकडे होणारी वाटचाल अगदी लहानसहान टप्प्यांनिशी सांगण्याचाच हा प्रयत्न आहे. या वाटचालीतील सहा प्रमुख टप्पे म्हणजे 'षट्‌स्थल' होय. जसे योगमार्गातील षट्‌चक्रांचे टप्पे, तसेच हे षट्‌स्थलांचे टप्पे होत.

डॉ. पंडित आवळीकर यांनी षट्‌स्थल सिद्धान्ताची थोरवी वर्णिताना म्हटले आहे की, "भक्तस्थलापासून ऐक्यस्थलापर्यंत होणारा अंगाचा हा प्रवास षट्‌स्थल सिद्धान्तात अद्‌भुत रीत्या स्पष्ट केलेला आहे. प्रत्येक स्थलामध्ये भक्तात जो बदल होत जातो, त्या बदलाची अचूक व आश्चर्यकारक नोंद षटस्थलांत आढळते. भक्तांच्या आत्म्यातील कंपनांची इतकी अचूक व विस्तृत नोंद दुसऱ्या कोणत्या तत्त्वज्ञानात घेतली गेली असेल, असे वाटत नाही. पुन्हा हे स्पष्ट केले पाहिजे की, षट्‌स्थल सिद्धान्त केवळ तत्त्वज्ञानाच्या स्वरूपाचा नाही, तर तो एक आचारधर्म आहे. तो निव्वळ बुद्धीवर अधिष्ठित नाही, तर अनुभवाधिष्ठित आहे. फिलॉसफीहून त्याचे मिस्टिसिझमशी अधिक जवळचे नाते आहे. किंबहुना तत्त्वज्ञान आणि अनुभव यांचा तो सुरेख संगम आहे."

षट्‌स्थल सिद्धान्ताच्या या स्थूल परिचयाच्या पार्श्वभूमीवर विसोबांचा 'षट्‌स्थल' हा लघुग्रंथ समजून घेणे वाचकांना अवघड जाणार नाही. त्यांनी शिवाच्या सद्योजातादी पंच मुखांपासून पंचीकृत सृष्टीचा पसारा कसा झाला, ते सांगून षट्‌स्थल सिद्धान्ताचा षट्‌चक्रांशी मेळ घालून दाखविला आहे. त्यांच्या मांडणीत प्रमाण वीरशैव ग्रंथांतल्या मांडणीहून जे वेगळेपण जाणवते, ते त्यांच्या पांचाळ ज्ञातीच्या पारंपरिक धारणांतून आलेले आहे. सृष्टिरचनाप्रक्रियेशी आपल्या ज्ञातिविशिष्ट व्यवसायांचा संबंध जोडण्याच्या प्रवृत्तीचा परामर्श आपण अगोदर घेतलेलाच आहे; तसेच 'गुरुमुख-मनमुखां'चा सिद्धांकडून आलेला विचार विसोबांनी कसा मांडला आहे, तेही आपण पाहिले आहे.

**संदर्भ-टीपा :**

१. रा. चिं. ढेरे, 'विविधा', पुणे, १९६७, पृ. १९१-२०३.
२. भा. इ. सं. मंडळ, पुणे, अहवाल : शके १८३८, पृ. १५६-१६४; 'त्रैमासिक', ४.१-४, शके १८४५, पृ. ६२-६९.
३. भा. इ. सं. मंडळ, पुणे, वार्षिक इतिवृत्त : शके १८३५, पृ. ५५.
४. वि. ल. भावे, महाराष्ट्र-सारस्वत, पाचवी आवृत्ती, पुणे, १९६३. पृ. १४३.
५. दीनदास (संपा.), भक्तविजय, बेळगाव, १९३०. पृ. ११७. (अध्याय ९, ओव्या १४३-२००)
६. ज. र. आजगावकर, श्रीनामदेवमहाराज आणि त्यांचे समकालीन संत, मुंबई, १९२७. पृ. ५५.
७. त्र्यं. ह. आवटे (संपा.), श्रीनामदेवमहाराज यांच्या अभंगांची गाथा, पुणे, शके १८३०. पृ. ४८
८. ज. र. आजगावकर, उपरिनिर्दिष्ट ग्रंथ, पृ. ५५.
९. तत्रैव, पृ. २४३.
१०. वि. ल. भावे, उपरिनिर्दिष्ट ग्रंथ, पृ. १४३.
११. ल. रा. पांगारकर, मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड पहिला, नाशिक, शके १८५४. पृ. ५८६.
१२. द. वा. पोतदार, 'खेचर' आडनाव, भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक, अंक क्र. १.
१३. दीनदास (संपा.), भक्तविजय, बेळगाव, १९३०. पृ. १२१ (अ. ९, ओ. २९८).
१४. ल. रा. पांगारकर, उपरिनिर्दिष्ट ग्रंथ, पृ. ५८६-५८८.
१५. तत्रैव.
१६. तत्रैव.
१७. बा. स. सुतार (प्रका.), शिल्पशास्त्र, इगतपुरी, नाशिक, १९०६.
१८. ल. रा. पांगारकर, उपरिनिर्दिष्ट ग्रंथ, पृ. ५८६
१९. गो. मं. कालेलकर, मुंबई इलाख्यातील जाती, बडोदे, १९२८. पृ. १२४-१२५.
२०. त्र्यं. ह. आवटे (संपा.), उपरिनिर्दिष्ट ग्रंथ, पृ. ४४-५६ (अभंग क्र. १२९-१६९).
२१. न. शे. पोहनेरकर, रट्टवंशीय बल्लाळ याचा अर्धापूर शिलालेख, मुंबई, १९६५. पृ. १९
२२. तत्रैव.
२३. ग. त्र्यं. देशपांडे (संपा.), विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६७, नागपूर, १९६८. पृ. १३२.
२४. श्रीनिवास रित्ती, जी. सी. शेळके (संपा.), इन्स्क्रिपशन्स फ्रॉम नांदेड डिस्ट्रिक्ट, नांदेड, १९६८.

२५. शं. गो. तुळपुळे (संपा.), लीळाचरित्र, उत्तरार्ध : भाग २, पृ. ९१ (लीळा क्र. ३९६).
२६. श्रीनिवास रित्ती, इ., उपरिनिर्दिष्ट ग्रंथ.
२७. चिमणलाल डी. दलाल (संपा.), आचार्य भासर्वज्ञविरचित गणकारिका, बडोदे, १९६६. परिशिष्ट, पृ. २९ व ३६ वरून उद्धृत.
२८. गो. मं. कालेलकर, उपरिनिर्दिष्ट ग्रंथ, पृ. १४६-१४७.
२९. चिमणलाल डी. दलाल (संपा.), उपरिनिर्दिष्ट ग्रंथ, परिशिष्ट, पृ. ३०.
३०. तत्रैव, पृ. ३६.
३१. ह. त्रि. सेठ, पाइअ-सद्द-महण्णवो (प्राकृत-शब्द-महार्णव), वाराणसी, द्वितीय संस्करण, १९६, पृ. ६
३२. रा. चिं. ढेरे, अ. प्र. कामत, श्रीनामदेव : एक विजययात्रा, पुणे, १९७१. पृ. ५२-५९.
३३. ह. रा. दिवेकर, चांगा वटेश्वरकृत तत्त्वसार, उज्जयिनी, १९३६. पृ. ७-८.
३४. नागेंद्रनाथ उपाध्याय, नाथ और संत साहित्य, वाराणसी, १९६५. पृ. ३१०.
३५. पीतांबरदत्त बडथ्वाल (संपा.), गोरखबानी, प्रयाग, संवत् २००३. पृ. ५७, ७४
३६. गुरमुख निहाल सिंह, गुरू नानक : जीवन, युग एवं शिक्षाएं, दिल्ली, १९७०. पृ. २९९-३०१.
३७. पंडित आवळीकर (संपा.), श्रीनिजगुणशिवयोगीकृत विवेकचिंतामणी, पुणे-धारवाड, १९६३. प्रस्तावना, पृ. ३७-४९.

❋❋



पांचाळ परंपरेतील पोथीतील चित्र. चोवीस भुजांचा गणेश.
(भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था, पुणे यांच्या संग्रहातून)



श्रीसंत नरहरी सोनार मंदिर, पंढरपूर येथील
चांगदेव वटेश्वरांनी चंद्रभागेत बांधलेल्या मंदिरातील विश्वकर्म्याची मूर्ती.
(आणून ठेवलेली.)



वाटेगाव येथील वाटेश्वर मंदिराच्या आवारातील चांगदेवमूर्ती.

विसोबा खेचर-विरचित

# शडूस्थळि ग्रंथ

## यथामूल संहिता



।। श्रीगुरुसचिदानंदाये नमः ।।

# ।। शड्रूस्छळि ग्रंथः ।।

---

## (प्रसंग पहिला)

□

ॐ नमो विघ्नेहरा। मोडिं अविद्येचा थारा।
घालिं अज्ञानासि बाह्येरा। अंधकारु हा।।१।।
नमन येकदंता। निरसिं विघ्नसमस्तां।
तारिं भववेथा। या दुरंधराचि।।२।।
नमन गजवदना। तुवां निवारावें अभीमाना।
प्रकाश करावा ज्ञाना। स्वयंज्योति।।३।।
नमन गणपति। तुजपासुनिया शृति।
येऱ्हविं हे स्मुर्ति। केवि बोलें।।४।।
नमन नरकुंजरा। तुं जी परात्परा।
जरि तुं वंद्यु निर्धारा। होसिं ग्रंथा।।५।।
नमन पंचमुखा। पिंडब्रम्हांडनायेका।
स्वयंज्योतिप्रकाशका। वीनायका जी।।६।।
नमन गजानना। सोभति चोविस भुजा जाना।
मिर्वति अयुध्ये प्रमाण। करुणाकरा।।७।।
नमो नमो विद्याधरा। चौदा विदियां माहेरा।
शंकरा विद्यया परात्परा। तुजापासिं।।८।।

नमन विकटरूपा। करिं आयुध्यें पाहा पां।
आतां तुवा करावि कृपा। विघ्नेहरा।।९।।
ऐसा नमिला गणेशु। तो करी ब्रह्मविद्यासौरसु।
स्वयें ज्ञानाचा प्रकाशु। अवलिळा करि।।१०।।
तयाचि लिळा अचोज। ब्रह्मादिक नाचति भोज।
तुं जी होसि निजांचे निज। सहजरूपा।।११।।
फरस कमळ करीं। पाश अंकुश धरी।
खांडे भक्षितु करीं। येके करिं लाडू देखा।।१२।।
येके करिं येक्षमाळा। दुजे करिं शिशाळा।
येके करिं त्रिशुळा। येके करिं डउर देखा।।१३।।
येके करिं धनुशे असे। दुजा करिं बाण कैसे।
येके करिं अंकुश दिसे। येके करिं साटू।।१४।।
येके करिं कपाळु। दुजां करीं मुद्‌गल सोहज्वळु।
सर्वांगिं विभुति निर्मळ। सोभति असे।।१५।।
येके करिं गदा। दुजे करिं कासि असे सदा।
येक विघ्नाते यौध्या। संग्राम करि।।१६।।
येकु कटिं ठेविला देखा। दुजयानि थापिला आइका।
येक करु मुक्तिदायका। ऐसें जाणावें।।१७।।
वैकुंठवाट दावि येकु। यैसा भुजांचा विशेखु।
चोविसां हस्तिं विनायेकु। मिर्वतु असे ।।१८।।
यैसें स्तवन करुनि। वर्णिला तो चिंतामणि।
मग प्रसंन्न होउनि। बोलता जाला।।१९।।
मग म्हणे नरकेशरी। तुवां विणविलें नाना परि।
आम्हि तुज कृपा निर्धारिं। केलि असे।।२०।।
आमचेनि वरदाने। तुंवां जे काहिं बोलणे।
तें आमतें घडेल अंगिकारणें। निर्धारिंसि।।२१।।

मग म्हणतुसे खेचरु (वि)सा। तुंवां वरु दिधला ऐसा।
मिं सलगि बहुवसा। आळि करितुसें।।२२।।
जेवि बाळक मायबापांसि। कृपा उपजवि ऐसि।
ते रात्रीदिवस तयासि। विसंबेति ना।।२३।।
तें आळि करी भलतैसि। परि ते पुरविति कैसि।
तैसा तुं माझया अर्थासि। तुष्टलासि पैं।।२४।।
तुझा कृपाकरु असे। तेणें स्वयंज्योति प्रकाशे।
निज मानसिं दिसे। वरदमुर्ति।।२५।।
तरी या शङ्कस्छळा। तुम्हीं कृपादृष्टि न्याहाळा।
वर्णिन जास्वनिळा। वोविप्रबंधे।।२६।।
याउपरी म्हणे गणेशु। तुज दृश्य असे वटेशु।
तोचि पैं महेशु। अस्तवि पां।।२७।।
आतां तुं ऐसें करी। नमिं पां ये कास्मिरेस्वरी।
आम्हा तयेसि अवधारिं। येकचि रूप।।२८।।
ऐसें बोलोनि विनायेकु। करी पंचमुखघोशु (पु-खु)।
मग पंचमो वेदि दिपकु। प्रकाशु केला।।२९।।
तयाचेनि प्रकाशें। स्वयंज्योति भासे।
तेणेंकरुनि मन उल्हासें। नमावया सारदेसि।।३०।।
(नम)न सारदे वेदमाते। सास्त्रें स्तविति तुतें।
पुराणे वर्णिति समस्तें। तुझा बडिवारु(।।३१।।)
नमन सारदे देवि। तुंवा कृपादृष्टी करावि।
माझी आळी पुरवावि। अपत्याचि।।३२।।
(नमन) सारजे मा(यें)। साक्षात्कारीं प्रत्यक्ष होये।
अब्दत्यदृष्टि (?) पाहे। निर्धारिंसि।।३३।।
नमन आ(दिसं) भवे। प्राकृता वाचा तुज केवि वर्णवे।
तुंवां माझीया कृपा प्रगटावें। ग्रंथरचनेसि।।३४।।

नमन ब्रम्हतनये। तुं साक्षात्कारी प्रत्यक्ष होये।
अंमृतदृष्टि करीं माये। ग्रंथ प्रकाशिं।।३५।।
नमन ब्रम्हात्मके। परब्रम्हविदे सहजे।
आगंम्य रूप तुझे। निरामये।।३६।।
नमो ब्रम्हनंदनि। तुं विक्षात त्रीभुवनि।
विस्तारु केला त्रिगुणी । गुणातित तु।।३७।।
नमो हंसवाहाणे। नमिले प्रबंधाकारणें।
तुंवां विस्तारासि नेणे। विज्ञाप्ति माझी।।३८।।
नमो ब्रम्हात्मके। चैतन्यरूपव्यापके।
निरसुन्यरुपके। निरामय।।३९।।
नमन करुनि आर्ति। नमिलि विस्वमुर्ति।
स्वरमानें देखा त्रुप्ती। इश्वरु केला।।४०।।
नमन करुनि सुन्यातिते। परब्रम्ह आधीष्टीते।
वोंकाररहीते। उलेखमात्रे।।४१।।
सरस्वति स्वरें आधीष्टीलि। सप्तस्वरीं मिर्वलि।
अळंकारा रुप करीति जालि। स्वरासि देखा।।४२।।
स्वरु असे मनोहरु। संतोसले संकरु।
स्वराचा प्रकारु। दृश्य केला।।४३।।
हातिं घेउनियां आळवनि। रंगिं शोभलि गायेनि।
संतुष्ट जाले शुळपाणि। वरु दिधला।।४४।।
विणा वाद्य घेउनि करीं। घोष मात्रृकागजरीं।
तारा आणि मंदीरिं। येकुचि स्वरु खेळे।।४५।।
सोळा स्वरीं देखा चालि। सतरावि देखा चैतन्यजीव्हाळी।
देखोनिया चंद्रमौळि। संतोशले।।४६।।
आळवि संगितरचना। साहित्य करुनि विवरणा।
ऐसी ते सरस्वति जाणा। स्वरनिधी।।४७।।

म्हणौनि स्वराचे सार जें कां। तेंचि सारजा ऐका।
बरी स्वरुपनायेका। प्रगटलि।।४८।।
ऐसी करुनियां स्तुति। स्तवन केले अन्यनगति।
नमन केलें नाना पदार्थी। सारदेसि।।४९।।
मग म्हणे ब्रम्हकुमारी। तुवां स्तविलें नाना परी।
तें परीस रे साक्षात्कारी। तुज बोध जाला।।५०।।
तवं खेचरु म्हणे ब्रम्हात्मजे। म्यां स्तविलें काहि जे।
बोलिलों प्रबोध कां जें। तें अंगीकारीजे।।५१।।
मग म्हणे ते सरस्वति त्वरीता। तुंवा संतोषविलें सर्वथा।
आम्ही तुज पुर्वि वरु या कवित्वा। प्रकाशु केलासे।।५२।।
ये शडूस्छळरचने। ग्रंथु प्रबंधु विस्तारणे।
तरी तुंवां प्रगट होणे। शब्दरचनेसि।।५३।।
ते वेळीं (म्हणे) ते मुक्ता। अरे अरे कृष्णाचया सुता।
जें काहि बोलसि तत्वता। तें तुं पावसील।।५४।।
ते मुक्ताइ सिवयोगिणी। पतिव्रतासीरोमणी।
राया विक्रमादित्याचि राणि। सत्यवंति।।५५।।
तिया भरतरीकारणे। पुरविलिं शडूरसपक्वाने।
तया पुरविलियांवांचुनि नेघणे। ग्रासमात्र।।५६।।
ऐसा नेमु चालविला। राजा विक्रम संतोषला।
भरथरी वैरागि मिरवला। योगियांमधी।।५७।।
तो येकवचनि भीक्षा करी। नित्य जाये राजमंदीराभीतरी।
तयासि भुक्ति ते सुंदरि। देति असे पै।।५८।।
ऐसे कितेक दीवस क्रमले। तया नेमनिष्टा चालविलें।
तेचि तप देखा लाधले। अंनदानाचें।।५९।।
( ) यानि शरी कृश जालें देखा। परीचारका म्हणति आइका।
राणियां नाये(का)। (आम्ही तुज अ)भ्यंगु करूं।।६०।।

मग आइत केलि माजन्यासि। तवं भ्रातुरि (आला घरासि।)
(तियेसि नग्न) देखोनि परतिसि। तेणें केलें।।६१।।
येरी विस्तारीलें होते बोणे (ताटीं)। (तें घेउ)नि लागलि पाठीं।
ऐसिं नगराचा सेवटिं। दोघें आलीं देखा।।६२।।
तवं तो न परतेचि आइका। तेथें प्रगट जाला गौरषी।
तवं तो तयास म्हणे अरे मुर्खा। भातुका (कां) रे नेघसी।।६३।।
तो म्हणे माता असे नगीन। कैसेनि घ्यावें म्या हे अंन।
तवं गोरषी म्हणे तुं अज्ञान। तुज ज्ञान नाहि।।६४।।
देखोनि तयचें निर्वाण। मग गोरखी जाले प्रसंन।
हस्तकु ठेविला मस्तकिं आपण। ततक्षणी ज्ञान जालें।।६५।।
हस्तकु ठेविला मस्तकिं। तंव तयसि लागली लक्षी।
मग भ्रातरीने केली पारखी। हा गोरेक्षी म्हणौनियां।।६६।।
ऐसा तयाचा उपदेसु। होये स्वये ज्ञानाचा प्रकाशु।
तो गोरषी परमहंस पुरुषु। भेटला देखा।।६७।।
मग ते केलि सचेतन। तुं जाइ आपुलिया निजस्छाना।
तवं येरी म्हणे प्रेत आणीलें शमशाना। ते केवि जाये।।६८।।
लोहो परीसाचि भेटि। तें कनक होउनि उठि।
कां अग्नी लागलीयां काष्टीं। न ये पुर्णदशे।।६९।।
तैसी योगीराजा तुझे दरशेन। भाग्यें पावलें तुझे चरण।
आतां जाणे परतोन। हे केवि घडे।।७०।।
तयेचे देखोन निर्वाण। गोरषीने मेखळा केलि परिधान।
मुक्त म्हणौनि मुक्ताइ आपण। नांव ठेविलें।।७१।।
मग तो भ्रातरी हरि। नाना परी नमस्कारु करी।
दंडप्रमाण करुनि चरणा धरी। मजवरी कृपा करा स्वामि।।७२।।
तयासि दीधला भरवसा। भेटी देइन बारां वरुषा।
निवृति तुझया मानसा। अझनु जालि नाहि।।७३।।

हे उजनिये नगरिस वितले। मुक्ताइस अनुक्रमें लाधलें।
शिवयोगज्ञान कथीले। सिवअहीक्याचें।।७४।।
ते मुक्ताइ चांगयाचा गुरु। आणि प्रसन्न असे वटेश्वेरु।
तेथुनियां विस्तारला संप्रधारु। वटेश्वराचा।।७५।।
तो चांगदेव आपण। वंदि गुरु मुक्ताइचे चरण।
सीवयोगज्ञान निर्वाण। वटेश्वरपंथी।।७६।।
लिंगनिष्टा नेमु। ऐसां चालविला सीवधर्मु।
वटेश्वरीं सांगविला सीवागमु। मुक्ताइकरविं।।७७।।
ते साक्ष सिवयोगिणि। तिया चांगदेवासि कथुनि।
साहीत्यसंमधु उपदेसुनि। योगज्ञान कथीले।।७८।।
कथीले शडूस्छाळज्ञान। तेचि वौंसिं चालिलें प्रमाण।
आचारियासि स्छळ मिरवण। केलें तिहि।।७९।।
ऐसा शडूस्छळविचारु। वर्णिला शडगुण ईश्वरु।
तोचि चालि(ला) संप्रधारु। विचारु शडूस्छळाचा हा।।८०।।
हे साध्ये केलें मिननाथें गौरक्षी। मग मुक्ताइस लाविलें लक्षी।
तेंचि चांगदेवासि साक्षी। उपदेसिलें।।८१।।
वरद गुरु कां इश्वरु। तयाचा होये कृपाकरु।
तरीच होये विवरु। शडूस्छळिं।।८२।।
येऱ्हविं शास्त्र देखोवेखिं। बोलतसे जन साक्षोपसाक्षी।
पिंडी नसोनि वोळषि। शब्ददेखि बोलति।।८३।।
त्याकारणें मुक्ताइस नमिलें। वौंसिं गुरुचें प्रसंन्नत्व लाधलें।
ते मुक्ताइच सारदा म्हणौनियां केलें। नमन देखा।।८४।।
ऐसा देउनियां वरु। आतां तुं वर्णि पां वटेश्वरु।
आनि कृष्ण सद्गुरु। स्तवि पां।।८५।।
नमन जी श्रीगुरुनाथा। तुवां निवारिली भववेथा।
बो(धु) केला जथातथा। अहेर्णेसिं।।८६।।

नमो जी श्रीगुरुस्वामि। कृपादृष्टि अवलोकिलें तुम्हीं।
सौरसु केला परब्रम्ही। साक्षात्कारिं।।८७।।
नमन जी श्रीगुरु। तुं भवसमुद्रिचे तारुं।
तुम्ही ठैविला कृपेचा (करु)। ततक्षीणी तरे।।८८।।
नमन हो श्रीगुरु दातारा। तुझयानि खंडति येरझारा।
सौंसारसा(ग)रा पार। (कर)विलें तुम्हीं।।८९।।
नमो नमो श्रीगुरुदेवा। तुं व्यापकु सदासिवा।
तुझया ( ) वा। कोण्हासि कळेति ना।।९०।।
नमन श्रीगुरुराया। तुं अपंगीसि जया।
काढीसी महाप्रळयो भया। पासुनियां।।९१।।
नमन श्रीगुरुराजा। तुं परब्रम्ह सहजा।
राजाधीराजा। श्रीगुरुस्वामि।।९२।।
नमन जी श्रीगुरु दातारा। तु जी परात्परा।
या आकारा निराकारा। वेगळाचि।।९३।।
नमो नमो जी सद्गुरु। तुं तवं करुणाकरु।
होसि कृपेचा सागरु। कृपावंता जी।।९४।।
तुमचेनि कृपाकरें। निरसलें अज्ञानआंधारें।
स्वयंज्योति निर्धारिं। प्रकाशु जाला।।९५।।
तुमचेनि हस्तकें। जीवित्व आपुला ठाइं नेदखें।
सर्व शिवमये असकें। देखें सदोदित।।९६।।
तुमचया संनिधी। तुटलि भवरोगव्याधी।
जालि देखा ज्ञानसिधी। दरुशेणमात्रें।।९७।।
यैसें तुमचें दरुशेण। तेणे होये शुध अंतकरण।
प्रउर्ति मनोधर्म। लिन होति।।९८।।
तुमचेनि चरणस्परुशें। हा प्रपंचाकारु निरसें।
निप्रपंच कैसें। होउनि ठाके।।९९।।

तुमचेनि अभीवर्धे। मन उल्हासलें तेणे बोधें।
प्रकाश स्वानंदे। जाला देखा।।१००।।
नमो नमो जी वरदानमुर्त्ति। तुं अकळु ये क्षीति।
तुमची योगप्राप्ति। जयासि लाभे।।१०१।।
नमो नमो ज्ञानसागरा। विवेकदिनकरा।
प्रकाशज्योति निर्धारा। स्वयें स्वरुपा।।१०२।।
नमो नमो ज्योतिप्रकाशा। तु जी परमपुरुशा।
तुमचा बोध या मानसा। अखंडित पैं।।१०३।।
नमो नमो कृष्णनाथा। तुंवां विस्तारु केला आदिनाथपंथा।
वटेश्वरु देखा तत्वता। प्रगटला तो।।१०४।।
ऐसें करुनियां नमन। तवं कृष्ण बोलिलें वचन।
अरे तुं स्तविं पां निर्वाण। वटेश्वरु।।१०५।।
नमन जी तुम्हा वटेश्वरा। तुं करीता या चराचरा।
ब्रम्हादिक आकारा। आणिलें देखा।।१०६।।
ऐसा तुं जी वटेसु। चंद्र सुर्य तुझा प्रकाशु।
दश दिशा दीसे हा विकाशु। पंच वगत्रांचा।।१०७।।
तुझीं जी ये पंच वगत्रें। ते मिर्वति पै स्वतंत्रें।
तेथें जन्मली भुतमात्रें। पंचतत्वें।।१०८।।
तरि सद्योजाता मुखा। पुर्विंचि उत्पति जालि देखा।
सुर्यप्रकाश विशेख। नेत्रांचा पै।।१०९।।
तेचि पूर्व जाणावि। जेथें जन्मलि पृथ्वी।
मनु उद्भवला स्वभावि। म्हणउनि पुर्वदिसा म्हणीजे।।११०।।
पुर्वि जन्मलि म्हणौनि। पुर्व ऐसें नाम ठेउनि।
अरुणोदयापासुनि। तयेसि संख्या केलि।।१११।।
दुसरें मुख तें उत्तरे। वांमदेवो तो निर्धारें।
आप विवरेनि झरे। तये मुखींहुनि।।११२।।

आप उत्तरलें देखा। म्हणौनि उत्तर म्हणति आइका।
धुरुमंडळ विशेखा। स्थापियेलें।।११३।।
मायेसि तेथें जन्म जालें। आपतत्व उपजलें।
ऐसें वामन मुख देखिलें। उत्तर दीसे।।११४।।
तिसरें मुख अघोर। पछीम दिसा निर्धार।
चंद्र करुनियां आधार। स्थापियेलें लल्हाट।।११५।।
तेथें जन्मलें तेजकल्लोळ। सूर्ये कोटि करीति झळाळ।
चंद्र कोटि सुसितळ। निववििति सर्वांतें।।११६।।
त्वष्टिकु जन्मला ये स्थानि। पश्चेम बोलिजें म्हणौनि।
ऐसे अघोरमुख जाणौनि। स्थापियेलें।।११७।।
चौथें मुख तें दक्षेन। तत्वपुरुष ऐसें जाण।
वायो तत्व देखने। दक्षेणेसि।।११८।।
दक्षेणमुखीं वायो असे। तोचि चळता वळता दिसे।
वायो स्वरातें प्रकाशे। स्वरभेदिं।।११९।।
ये मुखीं जन्म सिलपिकु। तो महिंद्रवज्रभेदकु।
पर्वतछेदकु। देवरावो।।१२०।।
आतां पांचवे मुख जाणा। जयातें म्हणति इस्याना।
तेथें जन्मलें तत्व गगन। जाणा(वे) निरुतें।।१२१।।
तें उर्धमुख आकाश। चहु दिशास प्रकाश।
संमरस जालें तदांस। तेथुनिचि।।१२२।।
तेथ जन्म देवोसु (दैवज्ञु) जाणा। यैसिं पांच तत्वें प्रमाण।
पंचमुखीं पंचभुतांसि आधीष्टाण। जाणावें (नि)रुतें।।१२३।।
ऐसा पंचमुषि विस्तारु। विस्तारला असे इश्वरु।
तोचि तो स्वयें संकरु। प्रगटला(असे)।।१२४।।
हे सर्वहि वैराट स्वरूप। तुजमध्ये होत जाये तद्रूप।
ऐसें तुझें अव्यक्त (निजरूप)। नित्य क(   ) ।।१२५।।

हे ब्रम्हादिक हरीहर। तुझें इच्छेचे अंकुर।
तुजमधीं होति निराकार। प्रळये अंतिं।।१२६।।
हे तुझे त्रिगुण साकार। पिंडब्रम्हांडासि आधार।
याचेनि वागे सचराचर। निरु(तें) पैं।।१२७।।
जैसा तुझा ब्रम्हांडिं प्रकाशु। तैसाचिं पिंडि प्रतिभाशु।
पंचमुखाचा विकाशु। दिसें मुखावरी।।१२८।।
तुझें मुखाचे विस्तारलेपण। तेचि पिंडि जाणावे पांचहि प्राण।
अज्ञु आंणि मनु चैतन्यकारण। तुवांचि आधिष्टीलें।।१२९।।
हा त्रैलोक्य तुझा विस्तारु। आणि त्रिगुण दिसे आकारु।
त्रिविधा शक्तिचा वेव्हारु। तुवांचि आधीष्टीला।।१३०।।
आधीष्टीलें साकारपण। म्हणउनियां पंचभुतिक कारण।
जालें म्हणौनियां उत्पन्न। पंचिकृतांसि।।१३१।।
मग तयां पांचांहि भुतांसिं देखा। दिधलिया पांच शक्ति आइका।
तया सहश्रसें येकयेका। विस्तारलिया।।१३२।।
त्यां शक्तिचें पांचहि प्राण। तो तुं येकु आत्मा प्रमाण।
तुजपासुनियां गुण। पंचविस देखा।।१३३।।
ऐसा तुं शडगुणईश्वरु। केवि बोलावा तुझा विस्तारु।
तुं होसि परासी परतरु। म्हणौनियां।।१३४।।
तुझा स्वरूपनिर्धारु देखा। न वर्णवें शेषादीकां।
तेथ मज प्राकृता मनुष्या। केवि बोलवैल।।१३५।।
तुझीये मुखीं ध्वनि। ते न समाये त्रिभुवनि।
ते वेद अनुहात वदे वानि। करीत असति।।१३६।।
अनुहातध्वनिचेनि गजरें। नादु भरला देखा अंबरें।
दशविध नाद गजरे। गजरु करीति।।१३७।।
तये ध्वनिचा जो घोशु। व्यापक पंचम वेदु।
जो सर्व व्यापुनि अभेदु। नेति शब्दें।।१३८।।

म्हणौनि म्हणति अनंतु। परी न कळे वेदांसि तु।
मग तुझा शब्द सिधांतु। निशब्दें जाणति जे।।१३९।।
तें निशब्द परब्रम्ह। हरीहरांसि निजधाम।
आत्मयांसि आदि अध्यात्म। अवसान जें कां।।१४०।।
जो हा चतुर्विधु आत्मा। चउं पदार्थी गुंफोनि जाला जिवात्मा।
यासि पर म्हणौनि परमात्मा। व्यापुनि असे।।१४१।।
ऐसा तुझा सिधप्रकाशु। प्रकाशला बहुवसु।
न चोजवे असंमसाहासु। अज्ञानासि।।१४२।।
म्हणौनि तेथें अंधज्ञान। बांधलें म्हणौनि यासि म्हणीजे बंधन।
जीवनमुक्तासि सज्ञान। म्हणीजे देखा।।१४३।।
ऐसिया अज्ञानासि भ्रमणी। घातलीसे गवसनि।
गोविलेंसे त्रिगुणी। मायासमेळ तें।।१४४।।
म्हणौनि माया असे अज्ञान। अविद्या आवरीले गुण।
प्रपंचाचें केलेंसे वेष्टण। बंधन यासि नांव देखा।।१४५।।
म्हणउनि सुधांसु सांडिला। माया अविद्या आवरीला।
नव्हता निराकरासि लाविला। आकारु हा।।१४६।।
ऐसें आकारीं आकारलें। अहंकारें विस्तारलें।
जैसें पशु असे चौखारलें। जयापरी।।१४७।।
त्याकारणे उमजु न पडे। ऐसें मांडलें कोडें।
परी धडपुडें नांतुडें। रुप तुझें।।१४८।।
म्हणौनि असे भुलला। उमजे ना देखा वहिला।
यैसा असे भ्रमला। न पवेचि तुज।।१४९।।
ऐसा तुझा स्वरुपनिर्धारु। जयासि कळला वेव्हारु।
तयासि तुं प्रसन्न इश्वरु। सर्व काळिं।।१५०।।
मग म्हणति वटेश्वरु। नको बोलों तुं हा विस्तारु।
गोप्य हा विचारु। प्रकट करुं नको।।१५१।।

मग खेचरु म्हणे जय जय स्वामि। जे कां आज्ञा दिधलि तुम्ही।
ते अनुर्वाच्य ब्रम्हीं। सौरसु केला।।१५२।।
ते वेळिं म्हणतसे वटेशु। तुं तवं आमुचा औंशु।
म्हणउ(नि)यां आमचा प्रकाशु। बोलतासि तुं।।१५३।।
यावरी विसा खेचरु म्हणें पुढति। तुम्ही उमेसि शडुस्छ(ळ) जय रीति।
कथन केले स्तिति। तें निरुपा स्वामि।।१५४।।
ऐसें म्हणउनि घातलें लोटांगण। उठिं (जा)लो प्रसन्न।
ऐसें बोलिले वचन। आदिनाथु।।१५५।।
तरी सांगावि शडुस्छळाचि आदि। ( ) विश्राम ( )धी।
हे ज्ञान करा कथन विधी। निर्धारिंसि।।१५६।।
मग म्हणे कविळासपति। (तु)ज पुर्विच ( ) लिसे स्तिति।
तयाचवऱ्हुनि दृष्टांति। विवरु करी।।१५७।।
ऐसें वटेश्वरुप्रसादें। म(न) उल्हासलें आनंदे।
ते हे शडूस्छळ वोविप्रबंधें। अनुवाद करीन।।१५८।।
करीन मऱ्हाटि टिका। येथील विचारु तुम्ही आइका।
पार्वति ते वेळे पिंनायेका। पुसति जालि।।१५९।।
देखा तया विचारासि। बहुत योगे गेलीं परीयेसिं।
तेथील उपमा यासि। केवि द्यावि।।१६०।।
येविशि जाणति स्वानुभविये। जयांसि शडुस्छळाचे धर्ये।
तेणे तरी वरद वटेश्वर ऐश्वर्य। प्रगटित होये।।१६१।।
चांगयाचेनि विशेखें। मातें अंगिकारीलें पिनायकें।
म्हणौनियां शडुस्छळ देखें। तयाचिपासाव।।१६२।।
यैसि शडुस्छळाचि महिमा। नेणेचि हरीहरब्रम्हा।
तो स्वामि कार्तिकु करी महीमा। शडमुखीं।।१६३।।
गणनाथु तो साक्षातु। जैसा कां तो आदिनाथु।
तेणे प्रगटिला हा पंथु। शडुस्छाळाचा ।।१६४।।

नंदि तो साक्षातु इश्वरु। शडुस्थळाचा स्छापनाविचारु।
विस्तारीला परीकरु। जानिजैसु।।१६५।।
विरभद्रें विचक्षणे। शडूस्थळी विवरु केला तेणें।
कार्याचि कारणें। बोलिला तो।।१६६।।
याचि परी गणी समस्तिं। शडूस्छळाचि स्छीति।
परीणामिलि निभ्रांति। साक्षात्कारिं।।१६७।।
तरी हें शिवअनुग्रहेविण। नव्हे याचें कारणज्ञान।
मग देखा आणिक कवण। जाणतिल।।१६८।।
हे नेणति पुरंधर। आणिक येक्ष सुरवर।
किंपुरुष किनर याचे पार। नेणतिच गंधर्व।।१६९।।
न कळेचि लोकपाळां। योगिणि आणि वेताळां।
चामुंडा कात्यायेणी सकळां। जाणतिच ना।।१७०।।
नेणतिच दैत्य राक्षस। आणिकहि बहूवस।
याकारणें जाणति ते तदांस। इश्वराचे।।१७१।।
इश्वराचे जे अनुगृहित। ते सिवयोगि विरगत।
सौंसार भस्मभुत। केला जेहि।।१७२।।.
प्रसन जयासि इश्वरु। तोचि बोलिजे योगेश्वरु।
जेणें सौंसारु असारु। भस्म उधळीला।।१७३।।
इश्वरज्ञानेविण। शडूस्थळिं कैचें विवरण।
ऐसें योगनिर्वाण। कोणासि कैचें।।१७४।।
इश्वर दृश्य जयासि नाहि। तो बोलैल काइ पांहिं।
अनुमाने कळेना काहिं। शडुस्थळ हे।।१७५।।
प्रत्यक्ष इश्वरज्ञान। जाणे देखा निर्वाण।
तयाचें बोलणें प्रमाण। यरांचे वाउगें।।१७६।।
इश्वरज्ञान तत्वता। तो सिवयोगि निभ्रांता।
येर तो आरता ना परता। मदलंड।।१७७।।

अनंत सीधांसी साधन। कथीलें ते आत्मज्ञान।
मग तिही निर्वाणसाधन। साध्य केलें।।६७१।।
साध्य केलि आत्मस्छिति। ते केलि आत्मउपास्ति।
अष्ट पाहार आराधीति। स्वयें शंकरासि।।६७२।।
तो आदिनाथु इश्वरु। मिननाथ तो मचिंद्र।
तयाचा होये कुमरु। गोरेक्षीनाथु।।६७३।।
गोरेक्षीचि दुहिता मुक्ताइ। चांगया वटेश्वरु पाहि।
उन्मेषु रामकृष्ण तोहि। वैसु (वौंसु) चांगयाचा।।६७४।।
तोचि हा संप्रधारु आदिनाथांचा। श्रीगौरक्षीनाथें प्रगट केला साचा।
तोचि विचारु कथीला योगाचा। कृष्णसुतें।।६७५।।
ऐसा वटेश्वराचा संप्रधारु। चांगयाचा वौसिं प्रसन्न इश्वरु।
म्हणौनि कृष्णकुमरु। आनुवादला।।६७६।।
ईती श्रीगुरुशिष्यसंवादु। तो हा शडूस्छळाचा भेदु।
मऱ्हाटी टीका वोविप्रबंधु। संपुर्ण जाला।।६७७।।
या वोविया पुष्पें प्रासिं। समर्पिलि मनोभावेंसि।
यापरी हरीख जालें वटेश्वरासि। खेचरु विसा म्हणे।।६७८।।

ईति श्रीशडूस्छळू संपुर्णमस्तु माहामंगळ भवतु।
सीवार्पणमस्तु। श्रीयेकनाथार्पणमस्तु।।छ।।

□□

# परिशिष्ट : एक

## 'षट्स्थल' : पाठस्वरूप :

'षट्स्थल' ग्रंथाचा बहिरंग-परिचय प्रस्तावनेत प्रारंभीच विस्ताराने करून दिला आहे. त्यापुढे या ग्रंथाची समग्र संहिता यथामूल स्वरूपात सादर केली आहे. हस्तलिखिताचे डावे दोन्ही कोपरे फार झिजून गेले असल्यामुळे सर्व पत्रांमध्ये दोन्ही कोपऱ्यांतील शब्द नष्ट-भ्रष्ट झाले आहेत. या जागा आणि अन्यत्र नष्ट झालेल्या अक्षरांच्या जागा गोल कंसांनी निर्दिष्ट केलेल्या आहेत. जेथे नष्ट झालेल्या अक्षरांचे अनुमान पूर्वापर संदर्भाने करता येते, तेथे अशी अनुमित अक्षरेही कंसातच टाकलेली आहेत. उदाहरणार्थ- ओवी क्र. २५६ मधीर वैरा (ग्य) हा शब्द पहावा. हस्तलिखितात प्रत्येक चरणानंतर द्विबिंदु चिन्ह आहे, त्याऐवजी मी दंड वापरले आहेत. सर्व ग्रंथाच्या लेखनात ऱ्हस्व-दीर्घादींच्या बाबतीत पूर्ण अराजक असूनही मी इतर कोणताच बदल केला नाही. प्रस्तुत हस्तलिखिताच्या लेखनाचे काही विशेष असे सांगता येतील.

१) स्थ हे जोडाक्षर बहुतेक ठिकाणी स्छ असे लिहिलेले आहे.

२) जेथे उकारयुक्त त लिहावयाचा प्रसंग असेल, तेथे त हे अक्षर जुन्या र सारखे लिहून त्याला उकार जोडला आहे.

३) काही ठिकाणी ऱ्हस्व उकार र या अक्षराला आपण उकार जोडतो त्याप्रमाणे पुढे जोडला आहे.

४) ऐ हे अक्षर दोन वेलांट्यांनी युक्त असे लिहिले आहे.

५) काही ठिकाणी ऐ हे अक्षर ऐ असेही लिहिले आहे.

६) ओवीक्रमांकांमध्ये गोंधळ झालेला असल्यामुळे, अभ्यासकांच्या संदर्भासाठी सोयीचे ठरावे म्हणून मी ओवीक्रमांक मात्र दुरुस्त करून घेतले आहेत.

७) पहिल्या प्रसंगाच्या अखेरी-अखेरीस ओवीक्रमांक २१६ व २१७ यांच्यामध्ये ९ ओव्या लिहून खोडलेल्या आहेत.

८) ओवी क्र. ४४७, ४४९, ४५४ व ४७१ या चार ओव्यांच्या लेखनात काही शब्द

गळलेले आहेत, ते पोथी फाटल्यामुळे नसून, त्या ठिकाणी मुळातच टिंबे टाकलेली आहेत. प्रस्तुत पोथीच्या नकलकारापुढे जी प्रत होती, त्या प्रतीतच ते शब्द त्याला मिळाले नाहीत, असा याचा अर्थ आहे. शब्दरूपे इतकी भ्रष्ट स्वरूपात लिहिलेली आहेत की, 'षट्स्थला'चे भाषाविशेष कोणते आणि लेखनगत अशुद्धता कोणती, याचा निर्णय करणे अवघड आहे. काही ठिकाणी तर अर्थनिर्णयाला बाधा येण्याइतकी लेखनगत अशुद्धता प्रकर्षाला पोचली आहे. पुढील काही शब्दांची रूपे भाषाविशेषांची उदाहरणे म्हणून सांगता येतील-

१) येकदंत, येऱ्हविं, येर, येक

२) शिउ, अनुभउ

३) शडमुख, शडुस्छल, शडांगयोगु

४) सिव, वटेस्वर, विस्वकर्म, इसान्य.

५) औंस, वौंस

६) च्यारी

७) येक्ष, पांचाक्षेर

८) प्रतिष्टिलिं, अधीष्टीला, स्वाधीष्टान

९) अज्ञी (अग्नी), इत्यादि.

१०) संक्षा (संख्या)

११) प्रसंन्न, आंणि, इत्यादि

परंतु भरतरी, भरथरी, भ्रातुरी, भ्रातरीहरि किंवा गौरषी, गोरषी, गौरक्षी, गोरक्षी, गोरेक्षी ही एकाच नावाची एवढी भिन्न लेखनरूपे भाषाविशेष म्हणून सांगता येणार नाहीत. संदेजात (सद्योजात), वामन (वामदेव), तत्वपुरुष (तत्पुरुष) या विशेषनामांच्या लेखनाच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. अशा भ्रष्ट लेखनामुळे काही ठिकाणी अर्थ-संदिग्धता निर्माण झाली आहे. उदाहरणार्थ, 'तारा आणि मंदीरिं। येकुचि स्वरु खेळे।।' (ओ. ४५) येथे ग्रंथकाराला 'तार' आणि 'मंद्र' असे शब्द अभिप्रेत आहेत, हे आपण पूर्वापर संदर्भानेच जाणून घ्यावयाचे. 'दंडप्रणाम' हा शब्द दोन वेळा वर्णविपर्ययाने 'दंडप्रमाण' असा वापरला आहे.

आणि हे चुकीचेच रूप ग्रंथकाराला अभिप्रेत आहे, असे दुसऱ्या वापरातील यमकाच्या गरजेतून स्पष्ट होते. (पहा : ओवी क्र. ७२ व २३०) त्याचप्रमाणे 'मायेसि तेथे जन्म जालें।' (ओ. ११४) आणि 'तेथ जन्म देवो सुजाणा।' (ओ. ३२३) या दोन ठिकाणी 'मयासि तेथ जन्म जालें।' आणि 'तेथ जन्म दैवज्ञु जाणा।' असे लेखन हवे. मनु, शिल्पिक, मय, त्वष्टिक आणि दैवज्ञ या पाच आचार्यांचा शिवाच्या सद्योजातादी मुखांपासून जन्म झाला, असा विषय चालू आहे, हे जाणून आणि 'शिल्पशास्त्रा'सारख्या अन्य ग्रंथातील एतत्सदृश विषय दृष्टीपुढे ठेवूनच आपणास येथे अप-पाठांचा निर्णय घ्यावा लागतो. अर्थात् एवढी लेखनभ्रष्टता असूनही मी संहितेत दुरुस्त्या केलेल्या नाहीत. जाणकारांना सूक्ष्म अध्ययनान्ती योग्य ते निर्णय घेता येतील.

संहितेच्या अखेरीस असलेल्या समाप्तिदर्शक पंक्तीत 'श्रीयेकनाथार्पणमस्तु' असे जे समर्पण आहे, त्यातील एकनाथ हे प्रख्यात 'एका जनार्दन' नसून, मुक्ताई-परंपरेतील रामानंदशिष्य रत्नाकरांचे नातू एकनाथ असावेत. हस्तलिखिताचा लेखनकाल ठरवण्यासाठी या अर्पणोल्लेखाचा उपयोग होऊ शकेल.

### खोडलेल्या ओव्या

हस्तलिखितात २१७ व्या ओवीनंतर नऊ ओव्या (क्र. २१८ ते २२६) लिहून खोडल्या आहेत आणि त्यापुढे लिहिलेल्या ओवीला १८ (२१८) हा क्रमांक दिला आहे. खोडलेल्या ओव्या अशा आहेत:

त्रीधा गुरु असति। ऐका त्याचिया उपपत्ति।
जो सांगे प्रपंचाचि युक्ति। तया गुरु ऐसे बोलिजे।।१८।।
जो वेदशास्त्र करी श्रवण। दावि शुध क्रिया आचरण।
रोहो पोहो शब्दज्ञान। तो जाणावा श्रीगुरु।।१९।।
आतां सद्‌गुरुचें लक्षण। सिधां (र्ती) बोलिलि खुण।
तेंचि आतां मि सांगैन। सद्‌गुरुआज्ञेकरुनि।।२०।।
जो स्वस्वरुपिं करी साक्षा(त्कारु)। ( ) वाचा विचारु।
तोचि जाणावा सद्‌गुरु। भवरोगवैद्य।।२१।।
ऐसे जे सद्‌गुरु असति। ( ) म्हणीजेति।
भाग्ये पाविजे त्याचि प्राप्ति। वेद गर्जति नेति मुखें।।२२।।
आतां दृष्टि ( ) दु। आ ( ) तत्ववेते साधु।

तो बोलीजेल यवंविधु। गुरुसंप्रदायें।।२३।।
प्रपंचाचें देखणे। गुण ( ) तेशिं विवरणे।
चर्मदृष्टि म्हणने। जडमुढवत।।२४।।
जाणे सारासारविवंचना। कार्येकारणी देख(णा)।
तो ज्ञानचक्षु जाणा। बोलिले माहासीध।।२५।।
आतां दिव्यदृष्टिचे लक्षण। जें दीव्य वस्तुचे दरुशेण।
जै भाग्य असे पुर्ण। तैं हे दशा लाभे।।२६।।

मुद्रित संहितेत या खोडलेला ओव्या 'आरंभि सांगितली क्रिया' (क्र. २१६) या ओवीनंतरच्या आहेत, याची वाचकांनी नोंद घ्यावी.

*

# परिशिष्ट : दोन

## 'षट्स्थला'तील विशेषनामांचे निर्देश

'षट्स्थला'तील विशेषनामांच्या निर्देशांची ही सूची पौराणिक व ऐतिहासिक व्यक्ती, स्थळे, ग्रंथ इत्यादींच्या नामांचा समावेश करणारी आहे. या सूचीत एका विषयाचे विविध नामपर्याय आणि एका नामाची विविध लेखनरूपे यांची नोंद केली आहे. आकडे ओवीक्रमनिदर्शक आहेत.

**क-ख**



**ग**

**भ-म**



**य-र**



**व**

**श-ष**



**स**

ह

# परिशिष्ट : तीन

## विसोबा खेचरांच्या नावावरील अभंग :

विसोबांच्या नावावरील ही पूर्णापूर्ण २१ स्फुटे मुद्रित व अमुद्रित साधनांवरून येथे दिलेली आहेत. त्यांत कमी-अधिक पंक्ती, पाठभेद आणि अनर्थकारी वा निरर्थक अपपाठ हे दोष विपुल आहेत. यांपैकी बरीच स्फुटे 'नामदेवचरित्राख्याना'पैकी दिसतात.

।।१।।

आर्धी चैतन्यें आपैतें करोनी। मग संचरे तारुण्यवनीं।
कामक्रोध तुज देखोनी। जाती पळोनी बारा वाटा।।१।।
तुजपाठीं कवण धांवे। कवण टाकी कवण पावे।
कामक्रोधें जग मोहावें। कासया शिरवावें पोटीं पाये।।२।।
मायामोहजाळी तुटेल पळ। नाहीं मरळ मां कैचा व्याळ।
का हे स्मरतोसी गोपाळ। मिथ्या व्याकुळ काजेवीण।।३।।
वैराग्यें दृढ होईं निरुता। परस्त्री तितुकी मानीं माता।
कासया भीतोसी चपेटघाता। विषयांनिमित्ता अल्पासाठीं।।४।।
धर्माचेनि मार्गे रिघाला कर्ण। सिभ्रु चक्रवर्ती जाला जीमूतवाहन।
तयांमाजी सांग नाडला कोण। लटिकी झकवण कां बोलतोसी।।५।।
मग घणीवरील धांवा पोकारिजे। काय हें सांगों शाहाणपण तुझें।
खेचर विसा म्हणे। अरे नामया।।६।।

।।२।।

मुळु वदनांचा आंगुळु हातांचा। उधानु नेत्रांचा स्वामी माझा।।१।।
मुगुट जयाचा केवल्याआगळे काटी। पइतृ तळवटीं चरण ज्याचे।।२।।
पोकु ते भागले शेली वेडावले। अंगुळुमंगी झाले थक्कित रया।।३।।
ढकार वदनांचा आला वर्णावया। जिव्हा चिरलिया न कळे त्यासी।।४।।
सद्भावें शरण आवारु जोडुनी। खेचर विसा चरणीं विनटला।।५।।

।।३।।
जळ स्थळ काष्ठ पाषाणु। पिंड ब्रह्मांड अणुरेणु।
सर्वस्वें आपणु। साक्ष असे।।१।।
हें जाणोनियां यापरतें। जाणें आपआपणियातें।
खेचर म्हणे नामयातें। अवघाचि देव।।२।।
श्रवणीं सांगितली मात। मस्तकीं ठेविला हात।
पदपिंडविवर्जित। केला नामा।।३।।
खेचर विसा। प्रेमाचा हो पिसा।
तेणें नामा कैसा। उपदेशिला।।४।।
सांगितलें गुज। दाखविलें निज।
पाल्हाळीं हो तुज। काय चाड।।५।।
खेचर म्हणे मज। ज्ञानराज गुरु।
तेणें अगोचरु। नामा केला।।६।।
।।४।।
माझी मूळपीठिका सोपान सद्‌गुरु। तेणें माथां करु ठेवियेला।।१।।
त्याचे कृपेंकरुन मीपणा ठकलों। देहभाना गेलों विसरुनियां।।२।।
चांगयाचा अंगीकार मुक्ताईनें केला। सोपान वोळला मजवरी।।३।।
जन्ममरणाचें भय नाहीं आतां। खेचरी तत्त्वतां मुद्रा दिली।।४।।
जिकडे पाहे तिकडे आनंद भरला। खेचर सामावला तयामाजीं।।५।।
।।५।।
पर्वतप्राय पापराशी होती दग्ध। वाचेसी मुकुंद उच्चारितां।।१।।
अच्युत श्रीहरी केशव नरहरी। माधव हरिहरी रामकृष्ण।।२।।
नामासी साधन करिसील पूर्ण। तैं प्रपंचाचें भान उरों नेदी।।३।।
उदासीन वृत्तीं आचरावें कर्म। नाहीं देहधर्म गुणमाया।।४।।
ऐसा हा अनकळित मार्ग साधे तुज। खेचर विसा गुज सांगे नाम्या।।५।।
।।६।।
भवजलधि अगाध तरावया दुस्तर। रचिलें पंढरपुर चंद्रभागीं।।१।।
तारू पंढरीनाथु मोलेंविण उतरितु। उभला असे तिष्ठतु वाट पाहे।।२।।
बुडत्याचें भय नाहीं गा संवसारीं। कलीमाजीं पंढरी नाव थोर।।३।।
राव रंक दोनी बैसवोनी वरी। उतरतु पैलतीरीं भरंवसेनि।।४।।
पक्षी कीट गुल्म कितीएक तारिले। खेचर विसा तारिले पुंडलीकें।।५।।

।।७।।
तुझें निजगुज तुजपासी आहे। विचारुनि पाहे मनामार्जी।।१।।
विवेक वैराग्य शोधूनियां पाहे। तेणें तुज होय ब्रह्मप्राप्ती।।२।।
ज्ञानाचा प्रकार सहजचि जाला। अहंभाव गेला गळोनियां।।३।।
खेचर विसा जेथें ओंकार निमाला। सहजचि जाला ब्रह्ममूर्ती।।४।।
।।८।।
नामदेवा काय करसी तळ तुळसी। उभा गा ठेलासी दर्भ जैसा।।१।।
भुका कां गा मरसी जेथींचा तेथें। केशवराज तूंतें आंतुडे ना।।२।।
नाहीं दया ध्यान ईश्वरीं भजन। वायांवीण प्राण कां करितोसी।।४।।
हरिभक्तीवीण जन्मलासी नरु। म्हणे विसोबा खेचरु अरे नाम्या।।५।।
।।९।।
जरी म्हणसी देव देखिला। तरी हा बोल भला नव्हे नाम्या।।१।।
जोंवरी मी-माझें न तुटे। तंव आत्माराम कैसेनि भेटे।।२।।
खेचर साह्यानें मी काही नेणें। जीवा या जीव इतकें मी जाणें।।३।।
।।१०।।
सड ना सांजवण खुंटा ना दावें। माये ना वासरू काय तेथें व्हावें।।१।।
आपे गाये आपण। आपण दोहे आपण प्रकाश।।२।।
खेचर विसा दोहे पांचही गाई। लेकी नाहीं तेथें कैचा घरजांवई।।३।।
।।११।।
मेघेंवीण जळ कीं जळेंवीण पूर। परी नाहीं उतार तेथें नख न भिजे।।१।।
आहे तें तें बुडे नाहीं तें तें तरे। लटकीयाचें खरें वाढवीसी।।२।।
म्हणे खेचर विसा तूं झालासी पिसा। सदृश्याची आशा सांडी नाम्या।।३।।
।।१२।।
सुखाचें सुखरूप घेउनी जा तरी। विठ्ठलनामें भरी तिन्ही लोक।।१।।
आशापाश यांहीं वासना पोखी। विठ्ठलनामा शेखीं घेउनी पाहे।।२।।
न लगती सायास करणें कायाक्लेश। आपण वैकुंठ येईल स्वयें।।३।।
नाठवी संसार नाठवी देहभाव। रोहिणी माव न कळे काय।।४।।
कुल्लाळकुसरी भ्रमत चक्र। आयुष्य आवर्त माया करी।।५।।
खेचर विसा म्हणे येथुनी काढिलें। तें तुज दिधलें जा रे नाम्या।।६।।
।।१३।।
श्रवणीं सांगितली मात। मस्तकीं ठेवियला हात।
पदपिंडविवर्जित। केला नामा।।१।।

खेचरु विसा। प्रेमाचा पिसा।
तेणें नामा कैसा। उपदेशिला।।२।।
तया सांगितलें गुज। आतां पाल्हाळी तुज काय काज।।३।।
मग खेचरु म्हणे मज। ज्ञान हेचि गुरु।
तेणें अगोचरु। केला नामा।।४।।

।।१४।।
सुखालागीं मन तुझें गिवसीत तळमळी। परी सुख आहे जवळी न कळे तुज।।१।।
दर्पणीं दीप्ति क़ीं दुग्धीं घृतशक्ति। परी करणीविण हातीं न लभेचि जाण।।२।।
सुखालागीं सुख सोय दाखवीन पाहें। अनुभवोनि होय सुखरूप।।३।।
सुख तें शांति सुख तें दया क्षमीं। सुख तें उपदेश मी निर्विकारीं।।४।।
सुख तें नैराश्य सुख तें हरिदास्य। सुख तें विश्वास सदा वसे।।५।।
सुख तें सत्संगतीं सुख तें नामीं प्रीती। सुख तें विकृति विषय भोगी।।६।।
सुख तें एकांतवास सुख तें लौकिक चास। सुख तें सरस सुस्वरूपीं।।७।।
म्हणे खेचर विसा परियसी विष्णुदासा। न घडे भरंवसा तरी अनुभवणें।।८।।

।।१५।।
भक्ति त्रिविधा षडविध नवविधा।
यजन याजन करोनी जीवातें दंडिताती सदा।।१।।
केशव परमात्मा नेणोनियां जी पतीतें।
पतनीं पडतां होतीं भुतें रया।।२।।
नाहीं रूप स्थिती नाहीं शब्द स्थिती। नित्य तया वस्ती निरंजनीं।।३।।
एकलें परब्रह्म गुरुमुखें जाणावें। तरी चुकवावें पुनरावृत्ति रया।।४।।
ऐसें रे नामया वचन ऐक पुढें। हे तो देवाविषयीं श्रुतीचे निवाडे।।५।।
श्रुती नेती नेती परतोनि आलिया। खेचर विसा पुढें सांगे नामया।।६।।

।।१६।।
येथोनि तेथवरी धांवोनियां गेलों। कांही नाहीं तें पाहुनीयां आलों।।१।।
कोठें गेलों कोठें धावुनी आलों। कांहीं नाहीं तें पाहूनियां धालों।।२।।
खेचर विसा म्हणे नामदेवा। कांहीं तें तुम्ही मज दाखवा।।३।।

।।१७।।
आप तेज वायु पृथिवी गगन।
मेलें तें कवण पांचांमध्यें।।१।।
आम्हां मरणचि नाहिं। मां मरसिल कायी।

आत्मवस्तूसि पाही। श्रीगुरुमुखें।।२।।
जिताचि मरण। आलें तें हाता।
मरण बोलतां। लाज नाहीं।।३।।
खेचर विसा म्हणे। आम्हां मरणचि नाहीं।
कैसें मरण आलेंसे। नाम्या तुज पाहीं।।४।।

।।१८।।
शून्यासी सारीलें नीरशुन्य भेदीलें।
अर्धशून्य त्यागीलें। वोळखोनी।।१।।
मध्यशून्य नाम। तेंही गिळीयेलें।
सहजीं हरपलें। अर्धशून्य।।२।।
शून्याशून्य पूर्ण। वस्तु निरंजन।
देवभक्तपण। आम्हां नाहीं।।३।।
श्वगतादि भेद। ब्रह्म एकाकार।
जाहला खेचर। पूर्ण विसा।।४।।

।।१९।।
हेंचि स्वयंब्रह्म पाहे। तुझा तुचि होउनि राहे।
आतां निर्विकल्प गाये। आरे गाये नामदेवा।।१।।
नोका जाऊं तु राउळा। सर्वा भूतीं पाहे डोळां।
बाप पांडुरंग भोळा। आहो भोळा येईल तेथें।।२।।
जें जें केलें बऱ्यासाठीं। भक्तकैवारी जगजेठी।
थापटी नामयाची पाठी। आहो पाठी खेचर विसा।।३।।

।।२०।।
....ब्रह्मा। हे मुख माइक।
वर्तती कल्पीक। जगामाजी।।१।।
त्यांचेनि भजनें। कैवल्याची प्राप्ति।
जीवा जीवन्मुक्ती। न ये हाता।।२।।
स्वयें उदकामाजि। आहे जो बुडत।
तो काय तारीत। आणिकासी।।३।।
देवभक्तभ्रांती। सांडुनीया देहीं।
खेचर म्हणे घेई। ब्रह्मसुख।।४।।

*

# परिशिष्ट : चार

## श्रीविसोबा खेचर-कृत 'हरिश्चंद्र-आख्यान'

('सन्मणिमाला कवितासंग्रह', वर्ष २, अंक ३, पौष शके १८१७ : इ; स; १८९५)

पुण्यवंत प्राणी सत्यवादी नृप। धर्मिष्ठ प्रताप नीति-न्यायें।।१।। रुक्मांगद व्रत करी एकादशी। सत्व राखायासी पुत्र वधी।।२।। तैसाच श्रियाळ पुत्राचें भोजन। शीर कर्वतून मयुरध्वज।।३।। मांस तोडूनियां दिधलें शिबीनें। घेतलें विकून हरिश्चंद्रें।।४।। धैर्य पाहुनियां देवाजी प्रसन्न। मनोरथ पूर्ण सत्वभक्तीं।।५।। लटकें हें साच करूनियां स्वप्न। राज्य दिधलें दान ब्राह्मणासी।।६।। अयोध्या नगरीं राजा हरिश्चंद्र। सत्वाचा समुद्र हरिभक्त।।७।। सूर्यवंशी राजा दानधर्मशीळ। हरिचा केवळ शूर भक्त।।८।। कोण्ही एके दिनीं वसिष्ठ तपस्वी।। गेला कैलासासी शिवभेटी।।९।। देवुनि सन्मान सभेसि बैसला। त्या पुसों लागला सदाशिव।।१०।। मृत्युलोकीं राजा बहु पुण्यवंत। त्यामाजी विख्यात कोण सांगे।।११।। वसिष्ठ तों ह्मणे अहो शुळपाणी।। पाहतां मेदिनीं एक आहे।।१२।। अयोधेसी आहे हरिश्चंद्र राजा। ऐसा नाहीं दुजा त्रिभुवनीं।।१३।। विश्वामित्र ऐसें ऐकोनि वचन। चढला दारुण अति क्रोधा।।१४।। आपुल्या शिष्याची करितोसी स्तुति। जालें दोघां प्रति संभाषण।।१५।। विश्वामित्र ह्मणे सत्वासी टाळीन। न टाळतां पुण्य देऊं आह्मीं।।१६।। करूनियां पण निघाला सत्वर। आला विश्वामित्र भूमिवरी।।१७।। हरिश्चंद्राचिया उभा राहे स्वप्नीं। लगाम लेखणी अंकुश तो।।१८।। गज आणि अश्व लेखणी मागत। हरिश्चंद्र देत ब्राह्मणासी।।१९।। सूर्योदयीं स्वप्न हरिश्चंद्र सांगे। विश्वामित्र वेगें आला सभे।।२०।। अर्घ्य पाद्य पूजा सन्मान करूनी। जोडुनियां पाणी वचन बोले।।२१।। धन्य माझें भाग्य धन्य माझें पुण्य। स्वामीचें दर्शन जालें आजी।।२२।। देव द्विज संत ब्राह्मण तपस्वी। सुदिन लाभासि आजि आला।।२३।। बहुत दिवसीं स्वामी कृपा केली। अनाथा माऊली भेटी तैसी।।२४।। इच्छित मागावें सादर पायांसी। येरू ह्मणे निशीं दत्त केलें।।२५।। लगाम लेखणी अंकुश गजादि। अश्व देई आजि दक्षणेसी।।२६।। हरिश्चंद्र तेव्हां आणुनियां ठेवी। दक्षणा आणावी राज्यावरी।।२७।। भांडाऱ्यासी ह्मणे द्रव्य तें आणावें। तुज काय होय भांडारात।।२८।। लगामांत सर्व अश्वाचिया शाळा। अंकुशांत आला गज मेळा।।२९।। लेखणींत सर्व संपत्ति ही आली।। मुर्खत्वाची बोली बोलतोसी।।३०।। देऊनि दक्षणा निघें वेगीं नीट।। राहावया कोठें ठाव नाहीं।।३१।। विश्वामित्र ह्मणे दक्षणा सत्वर। राज्याच्या बाहेर द्रव्य आणीं।।३२।। तारामती

गृहीं जाताना धरिली। खांबासी बांधिली विश्वामित्रें।।३३।। तारामती राणी छड्यांनीं मारिली। रोहीदास घाली नमस्कार।।३४।। विश्वामित्र ह्मणे कोणाचें हें पोर। आपुला किंकर पुत्र माझा।।३५।। उपद्रव माझ्या राज्याला करील। रोहिदासा मारीलें विश्वामित्रें।।३६।। ह्मणे विश्वामित्र राज्या हें वेगळें। काशीखंड भलें तेथें जावें।।३७।। अवश्य ह्मणेनि राजा सिद्ध झाला। विश्वामित्र त्याला द्रव्य मागे।।३८।। अवधी मासाची करूनियां नेम। यावें समागमें देऊं द्रव्य।।३९।। प्रधानासी राजा सांगे विनऊनी। तुमचा तो धणी विश्वामित्र।।४०।। आज्ञा हे प्रमाण करावी सर्वत्रीं।। तेव्हां कारभारी कष्टी होती।।४१।। सोडी तारामती वस्ती घे हिरोनी। जावें देशांतुनि हेंचि वेळे।।४२।। जीर्णवस्त्र तेव्हां नेसुनि निघाले। जनांचिया डोळे अश्रुधारा।।४३।। पुढें हरिश्चंद्र मागें तारामती। रोहिदासमूर्ति तयांमागें।।४४।। ग्राम पुर क्षेत्र पट्ट टाकिती। पर्वत पाहाती नद्या रम्य।।४५।। भयानक वन भ्यासूर यक्षीणी। दिसती शाकीनी विक्राळचि।।४६।। झोटींग वेताळ भूत भैरवादी। आणि श्वापदादी महा सर्प।।४७।। वृक्ष ते निबीड सिंह व्याघ्र वृक। पक्षी सकळीक करिती शब्द।।४८।। जातां जातां पुढें कोठें आडसीत। सूर्या तपवित विश्वामित्र।।४९।। तृषाक्रांत तीघें छाया जळ नाहीं। विश्वामित्रें पोयी सिद्ध केली।।५०।। छाया अन्न जळ विप्र ह्मणे घेई। विश्रांतीसी राहीं दिवस एक।।५१।। राजा ह्मणे अन्नजळ तें पोयीचें। न घेऊं हे सांचे गेल्या प्राण।।५२।। पुढें जाय राजा आली तारामती। अपेक्षीत चित्तीं तेंचि घ्यावें।।५३।। छत्रांत जे घेती अन्न जळ फळ। सुकृत निर्फळ होय तयांचें।।५४।। ऐसें ह्मणोनिया तेथुनी निघाली। रोहिदास बोली हेंचि बोल।।५५।। विश्वामित्र तेव्हां विस्मित जाहला। ह्मणे राजा आला अनवाणी।।५६।। पाय पोळती भारी देई पादरक्षा। ब्राह्मण अपेक्षा पुरवावी।।५७।। पादरक्षा रावें विप्रासी देवूनी। हरीच्या भजनीं रत झाला।।५८।। मायेचा वोणवा लाउनियां सांगे। हरिश्चंद्र तो गे जळतसे।।५९।। तारामती शोक करित आक्रोशें। देवें जगदीशें काय केलें।।६०।। नामावळी घेतां मिथ्या साच झालें। विघ्न निरसलें ओणव्याचें।।६१।। आणिक कौतुक विश्वामित्रें केलें। वाघानें गिळीलें हरिश्चंद्रा।।६२।। वेषधारी विप्र तारेसी सांगतो। मानवा तो खातो महाव्याघ्र।।६३।। भयें पळोनियां आलों मीं त्वरीत। कांहीं पुण्य होतें तरीच आलों।।६४।। देखोनियां राणी गडबड लोळे। तोडीत कुरळे तोंड पिटी।।६५।। सूर्यवंशी राजा पुण्य-परायण। ऐसें कां मरण त्यासी आलें।।६६।। हर हर शंभु शिव सदाशिवा। माझा प्राण जावा पतीआधीं।।६७।। सूर्य उदयतां लय जाली निशी। पाहिला दृष्टीसीं राजा सुखी।।६८।। छायेखालीं राजा मुहूर्त बैसला। रोहिदास आला तारामती।।६९।। ब्राह्मणाचें द्रव्य जावो त्याच्या हाता। हेंचि करी चिंता रावराणी।।७०।। श्रमाचें सार्थक तेव्हांचि होईल। विप्र संतोषेल द्रव्य देतां।।७१।। इच्छा भगवंताची म्हणोनि चालिलों। कवतुक केलें विश्वामित्रें।।७२।। आजगरें राव

गिळिला समग्र। विश्वामित्र सांगे तारेप्रती।।७३।। कासावीस जाली ऐकुनियां गोष्टी। फार होत कष्टी तारामती।।७४।। गोपाळा गोविंदा अनंता केशवा। कपाळाचा ठेवा सरला नाहीं।।७५।। भगवंतस्मरणें मायेचा तो लय। हरिश्चंद्र पाहे पुर्ववत।।७६।। विश्वामित्र म्हणे कोठें आटपेना। सत्वासी टळेना काहीं केल्या।।७७।। काशीपुरीं आला हरिश्चंद्र राजा। तारामती द्विजा रोहिदास।।७८।। तृणाचिया पेंढ्या मस्तकीं देवूनी। विकत घ्या कोण्ही म्हणे लोका।।७९।। रूपवान सुंदर सगुण चांगले। पहावयास आले नरनारी।।८०।। हाळहाळ जन सर्वही करिती। निर्दय निश्चितीं दुष्ट नष्ट।।८१।। पाहुनियां जन आपुलिया घरा। ऐसिया सुंदरा नचि घेऊं।।८२।। काळकौशिक हा ब्राह्मण तो आला। म्हणे इच्या मोला काय सांगा।।८३।। एक भार द्रव्य देवून दोघांचे। माता पुत्र साच नेलीं दोघें।।८४।। बाहुक तो डोंब द्रव्य देवुनियां। घरा आपुलिया राव नेला।।८५।। दक्षणेचें द्रव्य देवूनि ब्राह्मणा। आनंदला मनीं हरिश्चंद्र।।८६।। डोंबराणी म्हणे कशाला आणला। सुखवासीला करा पुजा।।८७।। सेवा सर्व सांगा करीन चांगली।। जे तुमचि बोली तैसें करीं।।८८।। डोंबराणी तेव्हा दळाया बैसवी। दळण रावही दळीतसे।।८९।। फोड फुटुनियां हातचे ते गेले। डोंबराणी बोले पाणी आणीं।।९०।। घेऊनि घागर भागीरथी भरली। विश्वामित्रें केली करणी ते।।९१।। खडा मारूनियां घागर फोडीली। आणिकही दिल्या पांच सात।।९२।। अर्धमार्गी येतां घागरी फोडील्या। डोंबराणी त्याला मारी काष्ठ।।९३।। परी मुखें नाम शिव शिव हरी। राव पाणी भरी त्वरें त्वरें।।९४।। रांजणालागीं छिद्र पाडी विश्वामित्र। डोंबराणी ताडी काष्ठ हातें।।९५।। ऋणकरी कैंचा असे ओडवला। केशीया धरिला खालें पाडी।।९६।। ताडण करूनि न लागे पोषणा। राखावें स्मशाना डोंब सांगे।।९७।। अवश्य म्हणोनि स्मशानासी आला। करूनि नेमला पाक करी।।९८।। गंगेसी नैवेद्य करूनि बैसला। विश्वामित्र आला विप्रवेषें।।९९।। उपवासी बहु अन्नाविण जालों। म्हणोनियां आलों तुम्हापासीं।।१००।। बहुसुज्ञ होसी तुज काय बोध। राव म्हणे सिद्ध करा भुंक्ती।।१।। भोजन करूनि विश्वामित्र गेले। उदक सेविलें हरिश्चंद्रें।।२।। उपवास नित्य हरिश्चंद्र करी। मुखीं हरि हरि रामकृष्ण।।३।। तेणेंचि आनंदें स्मशान राखीत। डोंबाचे आज्ञेंत प्रेतअग्नी।।४।। कौशिकाचे घरीं तारामती राणी। आणावया पाणी शिरीं कुंभ।।५।। घराच्या समीप आली तारामती। खडे मारी गुप्ती विश्वामित्र।।६।। फुटुनि घागर आंग भिजतसे।। आणीक जातसे दुसरेन।।७।। तोही फोडियेला दोन चार वेळे। कौशिक बोले दुष्टोत्तरीं।।८।। कांहीं एक दीन ऐसें जाल्यावरी। रोहिदासा करीं पुष्पें आणी।।९।। ब्रह्मचारी मुलें मिळोनि बागांत। रोहिदास त्यांत पुष्पें तोडी।।११०।। विश्वामित्र नाग होऊनि बैसला। रोहिदासा केला दंश क्रोधें।।११।। मरण पावला देखोनियां मुलें। ऐकावें माऊले तारामती।।१२।। तुझा रोहिदास

सर्पानीं खावोनि। मरण पावुनि पडलासे।।१३।। गांवाचे बाहेर पुष्पाची वाटीका। मोगरा चंपका जाई जुई।।१४।। कमळ तोडीतां महासर्प दंश। पुत्राच्या प्राणांस काळ जाला।।१५।। तारामति कंठ भरूनियां आला। विवेक मनाला केला तेव्हां।।१६।। स्वयंपाक केला ब्राह्मणा वाढीलें। काम आवरीलें घरांतील।।१७।। अस्तमान झाला बाहेर निघाली। देवा कैसी केली ताडातोडी।।१८।। बागा मार्ग कोण पुसतसे लोका। समोर तो देखा जावें त्वरें।।१९।। दुःखामाजि श्रेष्ठ पुत्रमोह भारी। विकळ सुंदरी पडियेली।।१२०।। मर मर धात्या कैसें तें लिहिलें। एकुलतें मेलें बाळ माझें।।२१।। राज्य गेलें सर्व तिघांचा विघड। कपाळाची द्वाड कैसी देवा।।२२।। जन्मपरीयंत नाहीं केलें पाप। तरी देवा कोप कैंचा केला।।२३।। देव द्विज संत स्वकर्म आचार। केला सत्या धीर विश्वामित्रीं।।२४।। उठोनि पाहात जात सैरावैरा। न दिसे आंधारा रोहिदास।।२५।। प्रहर रात्र झाली फिरतां अंधारीं। प्रेताचिया शिरीं पाय लागे।।२६।। उचलून घेत मुखा मुख लावी। कपाळ बडवीं तोंड पीटी।।२७।। मसीं बोल बाळा एक गोष्टी आतां। रुसूं नको सुता कुळदीपा।।२८।। सूर्यवंशीं राजा होसी पुण्यशीळ। मरणचि व्याळें जालें तुज।।२९।। डोळे उघडोनि पाहें मजकडे। तुजसाठीं वेडें जालें बाळा।।१३०।। तान्हीया पाडसा सुंदर सगुणा। पंचक्रोशीं प्राणा समर्पीलें।।३१।। आक्रोशें रडतां मध्यरात्र जाली। शिव चंद्रमौळी कैसें केलें।।३२।। सत्वासी टळेना म्हणे विश्वामित्र। येवोनि पवित्र ऊठ म्हणे।।३३।। भागीरथीतीरा नेवुनी प्रेतासी। घालावें अग्नीसी संस्कारी।।३४।। उगवतां दिन डोंब मागे द्रव्य। दहन न होय पुत्र तुझा।।३५।। स्मशान कोठें हें नकळे मजला। उचली प्रेताला दाखवितों।।३६।। मनकर्णिकेच्या घाटासी आणिलें। काष्ठें मेळविलीं अग्नी देत।।३७।। जाळ जाल्यावरी विश्वामित्र निघे। रक्षकातें सांगे जाळ होतो।।३८।। स्मशानांत ज्वाळा चोरूनि दहन। करीतसे कोण करीतसे।।३९।। राव क्रोधयुक्त येवोनि स्मशानीं। चिता विध्वंसूनी टाकियली।।१४०।। पाणी घालूनियां समग्र विझवी। अग्नींत मेळवी प्रेत कां गे।।४१।। चोरुनिय। प्रेत जाळीसी गे धीटे। म्हणोनियां काष्ठें मारितसे।।४२।। आहेस तूं कोण, सांगें वर्तमान। ऐकावें वचन महाराजा।।४३।। पुण्यवंशी राजा पुण्यशीळ धर्मी। अयोध्या ते ग्रामीं हरिश्चंद्र।।४४।। आहे कांता त्याची मीच तारामती। रोहिदास प्रीति पुत्र एक।।४५।। विश्वामित्रा राज्य देऊनि काशीसी। आलों दक्षणेसी द्यावयातें।।४६।। कौशिकाचे गृहीं देउनि दक्षणा। सहा मास जाणा होतों दोघें।।४७।। कर्म विपरित पुत्रासी मरण। सर्पानें मारून टाकिला बागे।।४८।। ब्राह्मणें येऊनि सांगितलें मज। आतां होता द्विज कोठें गेला।।४९।। जाळूं नको म्हणे तेथून निघाला। ठिकाणीं बैसला पूर्व स्थानीं।।१५०।। घळघळा रडे हरिश्चंद्र राजा। देवा महाराजा तुझी इच्छा।।५१।। आला विश्वामित्र भय घाली पोटीं। लांव एक मोठी जीव खाती।।५२।। प्रेत घेउनियां देऊळीं

बैसावें। सुर्याचा उदय होय तंव।।५३।। दाखवी देऊळ बैसवी देऊळीं। श्रमे निद्रा आली प्रेत पुढें।।५४।। मध्यरात्र जाली विश्वामित्र आला। पुत्राच्या काढील्या अंत्रमाळा।।५५।। गळां घालुनियां तोंडी देत मांस। रक्तही अंगास लावियलें।।५६।। ऐसें करूनियां महाद्वारीं आला। शंख वाजविला मारी हाका।।५७।। महाभयानक विक्राळ वदन। देऊळीं बैसोन नरा खाती।।५८।। भयें पळोनियां प्राणासीं मी आलों। पुण्य आचरलों जन्मोजन्मीं।।५९।। मला आंत घ्यावें धर्मासी घडेल। लावेसी माराल तरी बरें।।१६०।। नाहीं तरी लोका खाईल सर्वांसी। ऐकोनि कोपेंसी उठावले।।६१।। दीपिका लावुनी जमाव निघाला। घेवुनियां आला विश्वामित्र।।६२।। वेढिलें देऊळ देउळांत गेले। लांवेसी धरीलें जखडीली।।६३।। सूर्यउदयतां दीवाणांत आले। लांवेसी धरीलें काय आज्ञा।।६४।। शिरच्छेद करा डोंबासी सांगोनी। चालविली त्यानें मारायातें।।६५।। पहावया जन जालीसे दाटण। म्हणती बाळें इनें नेलीं फार।।६६।। कौशिकाचे घरीं हेचि होती खरी। गावांतील चोरी बाळें खाये।।६७।। सांगीतलें डोंबा मारावें लांवेसी। रक्षकांनी इसी छेद करीं।।६८।। भागीरथींत स्नान करूनियां आली। रायानें पुसिली खर्गधार।।६९।। आपुल्या देवाचें करावें चिंतन। नीट करीं मान महानष्टे।।१७०।। काशी विश्वनाथा मागणें मानसीं। पुरवीं कृपेसी ह्रेत माझा।।७१।। हरिश्चंद्र पती राणी तारामती। रोहीदास कीर्तीवंत पुत्र।।७२।। सद्‌गुरू वसिष्ठ विश्वामित्र धर्मी। द्यावा जन्मोजन्मीं याचक तो।।७३।। नारायण हरी नाम उच्चारीतां। विष्णु प्रगटतां जाला दिव्य।।७४।। शंखचक्र करीं मुगुट कुंडलें। पीतांबर रुळे माळा पदकें।।७५।। दर्शन देऊनि वरातें दिधलें। राज्य करा भलें अयोध्येचें।।७६।। सुख भोगोनियां अंतीं मजपासीं। वैकुंठनिवासी ऐसें वदे।।७७।। विश्वामित्र म्हणे सत्वधीर तुम्ही। सत्यवंत तैसे पुण्यश्लोक।।७८।। साठी हे सहस्र वरुषांचे तप। दिधलें अमुप तुम्हां लागीं।।७९।। राज्य हें आपुलें करावें सुखानें। अंतींचें हें राहणें वैकुंठांत।।१८०।। बहुत छळियलें राखीलें सत्वासी। प्रताप कीर्तीसी असा सुखें।।८१।। काशीवासी राजा येऊनी भेटला। समारंभ केला गजरेंसी।।८२।। उत्साह करूनि अपार दक्षिणा। तोषवी ब्राह्मणा धनधान्यें।।८३।। ऐशा समारंभी वसिष्ठही आले। प्रेमें आलंगीलें तिघां जणां।।८४।। हरिश्चंद्र राजा अयोध्येंत बैसे। निरोप घेतसे विश्वामित्र।।८५।। आपुलिया स्थाना वसिष्ठ तोही गेला। आनंद सर्वांला सर्व सुखी।।८६।। ऐसी कथा गाती ऐकती जे जन। संसारबंधन नाहीं त्यांसी।।८७।। आयुष्यवर्धन पुण्यवंत प्राणी। धनधान्य आणी सायुज्यता।।८८।। पुण्यश्लोक राजे याचें कथानक। नीरसे पातक विसा म्हणे।। ।।१८९।।

*

# परिशिष्ट : पाच

## नाथपंथ गुरुपरंपरा :

'षट्स्थल' हा ग्रंथ ज्या हस्तलिखित बाडामध्ये उपलब्ध झाला, त्यातच 'गुरुपरंपरा' नामक आणखी एक ग्रंथ अपूर्ण अवस्थेत शेवटी लिहिलेला आहे, हे प्रारंभी सांगितलेच आहे. हा ग्रंथ 'वैराटिका चाली'त म्हणजे मौखिक ओवीत रचलेला असून, त्याच्या पहिल्या ७६ ओव्या उपलब्ध झालेल्या आहेत. नष्ट झालेल्या पानांचा अंदाज पाहता, हा ग्रंथ एकूण सुमारे ५३० ओव्यांचा असावा.

उपलब्ध भागातील विषयाचे अवलोकन केल्यावर असे दिसते की, ही नाथसंप्रदायी 'गुरुपरंपरा' आहे. आदिनाथ शिवाने उमेला आणि मत्स्येंद्रनाथांना प्रबोधल्याची हकिकत या भागात आलेली आहे.'गुरुभक्तां पाहिजे गुरुपरंपरा।' म्हणून उत्कट श्रद्धाभावाने ही गुरुपरंपरा रचनाकाराने स्तविली आहे. मंगलाचरणातील शिववंदनात शिवाला चांगदेव-विसोबा यांनी म्हटल्याप्रमाणेच 'पंचवक्त्र' ('नमो पंचवगत्रा', ८) म्हटले आहे; तसेच 'संप्रदाया'साठी 'संप्रधार'(११) ही संज्ञा वापरली आहे. 'षट्स्थला'बरोबरच उपलब्धी, 'षट्स्थला'तील गुरुपरंपरेसारखीच आदिनाथ-मत्स्येंद्र नाथादि गुरुपरंपरा वर्णिणारा विषय आणि 'षट्स्थला'तील परिभाषेशी संवादी ठरणाऱ्या परिभाषेचा वापर या गोष्टी विचारात घेता हा ग्रंथ चांगदेव-विसोबा परंपरेतील कोणी तरी व्यक्तीने रचलेला असावा- कदाचित् तो विसोबांनीही रचलेला असण्याचा संभव आहे. दुर्देवाने त्यातील मत्स्येंद्रनाथांनंतरच्या नाथांच्या चरित्रांना आपण मुकलो आहोत. हा ग्रंथ संपूर्ण उपलब्ध झाला असता, तर गोरक्षनाथ, मुक्तादेवी योगिनी, चांगदेव इत्यादी महायोग्यांच्या जीवनावर विशेष प्रकाश टाकणारे साधन आपल्या हाती आले असते.

'गुरुपरंपरे'मध्ये मत्स्येंद्रनाथांच्या बाबतीत 'राघो मछापोटिं। घेतला अवतारु। म्हणौनि मछींदृ। नांव त्याचें।।' (४८) असे म्हटले आहे. आपणांस मत्स्येंद्रनाथांचें जे पारंपरिक अद्‌भुत चरित्र ज्ञात आहे, त्यात ते मत्स्याच्या पोटी प्रकटले, ही कथा येते. परंतु 'गुरुपरंपरे'त मत्स्याऐवजी 'राघो मत्स्य' आलेला आहे. त्याचा कसलाही अधिक तपशील दिलेला नाही. या 'राघो मत्स्या'चे स्पष्टीकरण मला पुणतांबे येथील चांगा केशवदासांच्या घरातील संग्रहात आढळले. 'नाथपंथ गुरुपरंपरा' हे १४ कडव्यांचे अभंगबद्ध प्रकरण चांगा वटेश्वरांनी रचलेले आहे. हे सर्वच प्रकरण येथे देत आहे-

सागराचे तटाकीं प्रबोधीतसे उमा।
आत्मज्ञानवर्मा उदय जाला।।१।।

तेथें वृक्षावरी एक शुक होता।
मत्स्येंद्रनाथ तत्त्वता मत्स्योदरीं।।२।।
बोधीत निजतत्त्व भवानीलागुनी।
मच्छिंद्रा श्रवणीं श्रवण जालें।।३।।
तैसेंच त्या सुख जालें निरुपम।
मत्स्येंद्रनाथ आपण प्रकट जाला।।४।।
मत्स्योदरीचे पोटीं मत्स्येंद्रनाथ जन्मला।
आदिनाथें बोधिला पूर्ण बोधें।।५।।
यालागीं मीनमार्ग तेथूनि प्रकटला।
पिपीलिका बोलिला पूर्ण बोधें।।६।।
तैसाचि तो शुक स्वानुभवें नेणुनी।
प्रबोधिली वाणी ऐकोनि गेला।।७।।
यालागीं तेथूनि विहंगममार्ग।
कांट्याकुट्या स्वर्ग जाणिजे तया।।८।।
मीनमार्ग विहंगम पिपीलिका उत्तम।
आदिनाथें उपक्रम काढिला आहे।।९।।
आदिनाथापासुनी तिन्ही मार्ग जाले।
नाथेंचि नाथिले तिन्ही मार्ग।।१०।।
मत्स्यपुराणीं हे पहावें शोधुनी।
नाथाघरीं पाणी सकळही वाहाती।।११।।
ऐसा नाथपंथ आदिनाथ समर्थ।
मत्स्येंद्र गोरखनाथा उपदेशिती।।१२।।
गोरक्षें अनुग्रह मुक्ताईस केला।
पंथ सांगितला नाथाचा हा।।१३।।
मुक्ताई उपदेशी चांगा वटेश्वर।
नाथ पंथ साचार आमुचा असे।।१४।।

चांगा वटेश्वरांनी रचलेल्या या प्रकरणात मीन, विहंगम आणि पिपीलिका हे तीनही मार्ग आदिनाथापासून झाले (९-१०), असे म्हटले आहे. मत्स्यापोटी जन्मलेल्या मत्स्येंद्रनाथापासून मीन आणि पिपीलिका यांचा प्रसार झाला आणि त्याच वेळी वृक्षावर बसलेल्या एका शुकाला श्रवण घडून, तेथून विहंगम मार्ग प्रकटला. पुढील 'गुरुपरंपरा' प्रकरणातील 'राघो मत्स्य' म्हणजे 'राघू' (शुक) आणि 'मत्स्य' होय, हे यावरून स्पष्ट होईल.

## गुरुपरंपरा

।। चाली वैराटिका।।

।। श्रीसच्चिदानंदाय गुरुवे नमः।।

ॐ नमो सद्गुरु। जगदात्मा इश्वरु।
प्रकृतिपरावरु। परमपुरुषा।।१।।
ॐ नमो जगत्पति। अभंग आदिमूर्ति।
स्वयंप्रकाश स्वशक्ति। आनादिरूपा।।२।।
ॐ नमो शंकरा। आगम्य आगोचरा।
नमन दीगंबरा। कैवल्यपति।।३।।
नमो कर्पुरगौरा। त्रीपुरांतकहरा।
नमो सर्वेश्वरा। शुळपाणि।।४।।
नमो जी या जुनाटा। नमन निळकंठा।
नमो आदिपिठा। वेदगर्भा।।५।।
नमो सकळहर्ता। दृशदहनकर्ता।
ऐसिया भगवंता। तुज नमो।।६।।
नमो योगीराजा। शीवा जी सहजा।
नमो आदिबिजा। गुरुगंम्या।।७।।
नमो पंचवगत्रा। नमो त्रियनेत्रा।
नमो आदिसुत्रा। सुत्रधारी।।८।।
नमो अपरमिता। अलक्ष अनंता।
अनुपंम्य वर्णिता। लिळा तुझी।।९।।
नमो विभुतिउधळणा। गजचर्मधारणा।
सर्पांगभुषणा। नमो तुज।।१०।।
नमो आदिगुरु। तुजपासुनि संप्रधारु।
तो वर्णावया वरु। देइं मज।।११।।
गुरुपरंपरा। सांगैन अनुक्रमें।
आवडि सप्रेमें। गुरुनामें।।१२।।

ऐका गुरुनामावळी। माहादोषां करी होळी।
पाविजे नव्हाळी। ब्रह्मसुख।।१३।।
गुरुभक्तां पाहीजे। गुरुपरंपरा।
अभक्तां पामरां। कोण काज।।१४।।
कैलाससिखरीं। बैसले चंद्रमौळि।
अर्धांगिं शैलबाळि। प्राणप्रीया।।१५।।
प्रीतिच्या पडीभरें। सास्टांगि नमन।
करूनि वचन। बोलति जालि।।१६।।
ॐ नमो जी देवा। परात्पर जगद्गुरु।
कांहिं यक प्रकारु। पुसणें तुम्हां।।१७।।
कृपा करूनि स्वामि। (करा) वि विवं (च) ना।
म्हणौनि चरणा। दीधली मिठि।।१८।।
तवं उठउनि शिवें। दीधलें आ(लिंगन)।
(उसं)गें बैसउनि। पुसते जाले।।१९।।
काये तुझा मनिं। वाटलें नवल।
तें सां (गे । ) दालें।।२०।।
तवं म्हणे गौरी। ऐकें जास्वनिळा।
माळ तुमच्या गळां। कास (याची)।।२१।।
मग म्हणे कृपाळु। पाहे वो गिरजे।
हें शिरकमळ तुझें। गळां वाहे।।२२।।
तुझ्या ( । ) में मि ( ) विभुषणी।
तुं भक्तसिरोमणी। म्हणउनियां।।२३।।
तवं बोले पार्वती। आश्चर्य करूनि चितिं।
म्हणे पाशुपति। अवधारा।।२४।।
तुम्हां मृत्यु नसतां। मज कां मरण।
सांगावि जी खुण। कृपा करूनि।।२५।।
हरु म्हणे देवि। आम्हां आहे गुरुकृपा।
गेल्यां अनंत कल्पां। क्षयो नाहिं।।२६।।
असंक्षात ब्रह्मे। कोटि विष्णु होति।
इंद्र गणीजेति। नदिवाळु।।२७।।

अनंत ब्रह्मांडें। होति घडीमोडी।
परी रोमहि वांकुडी। नव्हे माझी।।२८।।
माझें निमिष्य न भरतां। यव्हडी जाली भरोवरी।
ऐकोनियां गौरी। तटस्त ठेलि।।२९।।
म्हणे हा बहुकाळा जुनाट। आदिमुर्ति निळकंठ।
न कळे सेवट। आदिअंतु।।३०।।
मग घातलें दंडवत। सुखउर्मि स्फुंदत।
असे विणवित। योगिराया।।३१।।
ॐ नमो देवदेवा। स्वामि ज्ञानराजा।
अंगिकारू माझा। करा आतां।।३२।।
मि तवं हीन दीन। अत्यंत अज्ञान।
न कळे महीमान। तुझें देवा।।३३।।
मि तुझें अर्धांग। ज्ञान नाहिं मज।
हे कोणासि लाज। सांगा स्वामि।।३४।।
गुरुदिक्षा मज। करावि दयाळा।
म्हणौनि शैलबाळा। विनित जाली।।३५।।
मग कृपाउल्हासें। बोले त्रिपुरारी।
चालें वो सुंदरी। यकांतासि।।३६।।
जाउनि समुद्रातिरीं। केलें पद्मासन।
सन्मुख बैसउन। संप्रदायें।।३७।।
तेथें कर्णविवरीं। वोपिलें बिज।
दाखविलें निज। ब्रह्म डोळां।।३८।।
येरी जालि समाधीस्त। तटस्त इंद्रियेवेव्हारु।
पडीला विसरु। देहभावा।।३९।।
चतुष्टये अंतष्करण। चैतनिं जालें लिन।
हारपलें भान। जा (णि) वेचें।।४०।।
(ते)थें सामराज्यसुख। आनंद हि न दा (   ।)
निधा (   ।   ) ज्ञ (।।४१।।)
तेथील जे वार्ता। न ये वाचेसि बोलतां।
ते स्थिति अनुभविता। तोचि जाणे।।४२।।

शब्दासि अतित। मनबुधीविरहित।
तो स्वानंद सदोदीत। काये कळे।।४३।।
जें स्वयंप्रद (सो)ज्वळ। लखलखीत कलोळ।
तें तेज प्रबळ। दाखविलें।।४४।।
चंद्र सुर्यो अग्नी। जथचिं कि (रणें।)
ते प्रभा चिद्गगने। संसंव्येद्य।।४५।।
तवं उमेसि हे दसा। विसरु मानसा।
सुख स्वानंदविलासा। निमग्न जाली।।४६।।
येरीकडे हरु। गर्जे स्वाआनंदे।
उचंबळला बोधें। देखोनि भक्ति।।४७।।
राघो मछापोटिं। घेतला अवतारु।
म्हणौनि मछींदृ। नांव त्याचें।।४८।।
शंकरामुखीचि। ऐकिलीं अक्षरें।
शब्द हुंहुंकारें। देता जाला।।४९।।
मग राघो मछाचें। चिरुनि उदर।
आला तो बाहेर। समुद्रांतुनि।।५०।।
जोडूनि दोन्ही कर। पुढें उभा ठेला।
अकस्मात देखिला। माहादेवें।।५१।।
मग पुसे शंकर। तुं कवणाचा कवण।
यावया कारण। काये येथें।।५२।।
भुत किं अथवा प्रेत। राक्षस कि दैत्य।
न संगतां यथार्थ। करीन भस्म।।५३।।
देखोनियां क्षो(भ)। भयभित जाला।
नमस्कारु घातला। दंडप्राये।।५४।।
मग उभा राहुनियां। करसंपुष्ट जोडिलें।
बोलों आदरीलें। सत्यवाणि।।५५।।
पुर्व विवंचना। सर्व सांगितलि।
श्रवणीं पडीलि। (    )।।५६।।
तवं जालें दरुशेण। देखियेले चरण।
चुकलें जन्ममरण। यातायाति(।।५७।।)

(अनंत) जन्मांचें। पुण्य यकवाटलें।
म्हणौनियां देखिलें। आदिमुर्ति।।५८।।
(   ।   ) करीत।
निजबोधें गर्जत। जयजयकारु।।५९।।
(   ।   ) क्ति।
नमो उमापति। देवराया।।६०।।
तुं निर्गुण निरंजन। तुं आनंद चैतन्यघन।
(   ) सनातन। सदोदित।।६१।।
न कळे तुझा पार। तुं ईश्वरा इश्वर।
तुझा बडीवार। तुजचि साजे।।६२।।
चराचर (स्रुस्टी)सि। तुं निर्माण करीसि।
कृपेनें पाळीसि। कल्याणरूपा।।६३।।
सेवटिं सांटवण। सकळां तु आयेतन।
मग होउनि निर्गुण। निराकारु।।६४।।
करीतां घडीमोडि। नाहिं तुज वोढी।
नवल तुझी प्रोढी। अनाथनाथा।।६५।।
देवा चक्रवति। ब्रह्मादीक वर्णीति।
तेथें दिन किति। मि वर्णावया।।६६।।
सहश्रमुखें शेष। वर्णीता भागला।
निवांत राहीला। वेद तेथें।।६७।।
अनंत शास्त्रें पुराणें। वर्णीति नाना परी।
परी न कळेसि निर्धारीं। तुं कोण कैसा।।६८।।
उदरीचा गर्भु। मातेचें रूप करी।
हें जरी घडैल काळांतरीं। कोण जाणें।।६९।।
तैसें विश्व हें आघवें। आहे तुझा उदरीं।
तुज कोण्या परी। जाणों स्वामि।।७०।।
आधीं तुजवेगळें होवावें। मग तुज पाहावें।
पाहोनि वाणावें। रूप तुझें।।७१।।
तवं नांव रूपरेखा। वर्ण व्यक्ती नाहिं।
परी असिसि सर्व ठाइं। सतामात्रें।।७२।।

जें जें तुज वर्णावें। ते़ तें नव्हेसि स्वभावें।
मनबुधी माळवे। मौन्य वाचा।।७३।।
ऐसि करुनियां स्तुति। घालि दंडवत।
क्षणक्षणा गर्जत। जये जये शब्दें।।७४।।
मग संतोसोनि शिवें। नाभिकारु दीधला।
पद्महस्तु ठेविला। माथ्यावरी।।७५।।
तुं वरद ( ) आमुचा। ह(रु) बोले वाचा।
( ) ऐकोनि सुखाचा। सींधु जाला।।७६।।
म्हणे धन्य ( । । )

( अपूर्ण )

# परिशिष्ट : सहा

## पांचाळ परंपरेतील ग्रंथ :

विसोबा खेचरांचा 'षट्स्थल' हा ग्रंथ वीरशैवांच्या षट्स्थल सिद्धान्ताचे विवरण करणारा असला, तरी त्यात ग्रंथकाराचे पांचाळ ज्ञातिपरंपरेतून आलेले विचारधनही समाविष्ट आहे, हे आपण प्रस्तावनेत पाहिलेच आहे. विसोबांचे परमगुरू योगिराज चांगदेव हेही पांचाळांपैकीच असल्याने त्यांचा 'तत्त्वसार' हा ग्रंथ आणि विसोबांचा 'षट्स्थल' हा ग्रंथ यात शैव तत्त्वज्ञान आणि पांचाळांचे ज्ञातिविशिष्ट तत्त्वज्ञान या दोन्ही बाबतीत संवाद आहे, हे मी 'चक्रपाणि' या ग्रंथात चांगदेवविषयक दोन प्रकरणांत स्पष्ट केलेच आहे (पृ. १३७-१३८). मागे प्रस्तावनेत ज्या 'शिल्पशास्त्र' नामक प्रकाशित ग्रंथातून आधार उद्धृत केले आहेत, तशा प्रकारच्या अनेक अप्रकाशित रचना पांचाळ परंपरेत आढळतात. या बहुतेक शिल्पशास्त्रीय रचनांवर वीरशैव प्रभाव स्पष्ट जाणवतो. क्वचित् एखादी कृती जैन-प्रभावित आढळली, तरी अशा कृतीतही जिनेंद्र, तीर्थंकर, वर्धमान या जैन संज्ञांबरोबरच पांचाळांचे मनू आदि पंचाचार्य, विश्वकर्मा, चार वेद इत्यादि विषयांचे विवेचन शैव परंपरेला धरूनच केलेले आढळते. काही वर्षांपूर्वी उद्योगपती बाबूरावजी पारखे यांच्या मार्फत भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेच्या ग्रंथालयात पांचाळ परंपरेतील सात-आठ पूर्णापूर्ण संस्कृत आणि मराठी ओवीबद्ध हस्तलिखिते दाखल झाली. ती हस्तलिखिते तेथील साक्षेपी आणि संदर्भसेवापरायण ग्रंथपाल श्री. वा. ल. मंजूळ यांच्या सहजात सौजन्याने मला पहायला मिळाली. या हस्तलिखितांपैकी एका हस्तलिखितात 'षट्स्थला'तल्या वर्णनाशी संवादी अशा चोवीस भुजांच्या पंचमुख गणेशाचे आणि पांचाळ पंचाचार्यांना जन्म देणाऱ्या पंचमुख शिवाचेही रंगीत चित्र आहे. इतरही काही रंगीत चित्रे या पोथ्यांत आहेत. एका अशुद्ध संस्कृत कृतीत वटेश्वर संप्रदायाचा आणि चांगदेवांचा स्पष्ट निर्देश आहे. आणखी एका हस्तलिखितात विश्वकर्म्याला जगद्गुरू म्हणून गौरविले आहे. आणि विश्वकर्म्यापासून जन्मलेले पांचाळ पंचाचार्य हे 'शिवब्राह्मण' असून 'सर्व वर्णांचे गुरू' आहेत, असे अभिमानाने म्हटले आहे.

वीरशैव मराठी वाङ्मयाचा शोधपूर्वक अभ्यास करणारे जे अनेक उमेदीचे तरुण अभ्यासक आज महाराष्ट्रात कार्यरत आहेत, त्यांनी हे पांचाळ परंपरेतील रचनाभांडारही तपासायला हवे आणि त्यासाठी पांचाळांची मठ-मंदिरे आणि त्यांच्या गुरुघराण्यांतील भांडारे मुद्दाम धांडोळायला हवीत. श्री. मंजूळ यांनी मला दाखवलेल्या पोथ्यांतील एका

'शील्पीशास्त्र' (शिल्पशास्त्र) नामक अप्रकाशित पोथीतील पुढील ओव्यांचे बारकाईने निरीक्षण-परीक्षण केल्यावर माझ्या आवाहनाचे गांभीर्य नव्या अभ्यासकांना जाणवल्याशिवाय राहणार नाही. या उपरिनिर्दिष्ट ग्रंथातील दुसऱ्या प्रसंगातील (पत्रांक २० वरील) शेवटच्या १३ ओव्या (क्र. २९३-३०५) मी उद्धृत करीत आहे :

करीविराट तया क्षेत्रीं। कृष्णगंगा पवित्री।
त्याचे शिरीं वसे श्रोत्री। चांगदेव पैं।।२९३।।
कृष्णातीर दिशा पश्चम। वाटेगाउ असे ग्राम।
तेथे वटेश्वर निजधाम। प्रगटले।।२९४।।
त्या चांगदेवाकारण। पंचब्रह्म केले अधीष्टान।
विभक्तरूपे ईश्वर आपण। वटेश्वरु जाहले।।२९५।।
ते पंचब्रह्मचाळक। प्रगटले निःकळंक।
कलीकल्मशे अनेक। दूर करुनिया।।२९६।।
मग चांगदेवाळंगीले। कृपाकर शिरीं ठेविले।
वेगी माग रे तु वहीले। वरदान अमुचे।।२९७।।
गुरुदीक्षा आचारु। शीवयोग साचारु।
शिवऐक्य जो निर्ध्दारु। सांगीतला।।२९८।।
पंचब्रह्म ते पांच जन। तेही पहिले केले स्थापन।
(   ) पंचनिधान। प्रतिभाविले।।२९९।।
ठसावले ब्रह्मज्ञान। प्रगटले विश्वावतरण।
मन जाले मूर्छित उन्मन। शिवस्वरूपीं।।३००।।
तो पंचविध भाव पाचाचा। पंचवगत्रे जाण साचा।
ठसावला पंचब्रह्माचा। ठसा तेथे।।३०१।।
तेचि शिवाचारनिष्टा। सदाचारप्रतीष्टा।
आचारधर्म वरीष्टा। सुष्टदुष्टांते।।३०२।।
ध्यान धारणा समाधी। आसन साधन सिद्धी।
वटेश्वर मनोभावबुद्धी। केला संपूर्ण।।३०३।।
तया चांगदेवाचे वंशी। अकरावे(शे) शीस तंत्र पर्यसी।
तो शिवब्राह्मण सदाचारेसी। आचार्य विसा।।३०४।।
कृष्णकुमरु विश्वेस्वरु। पंचब्रह्ममहात्मकतत्परु।
मनुचार्याचा सांगे प्रकारु। आचार्य ईश्वर म्हणे।।३०५।।

या प्रदीर्घ उताऱ्यात अनेक महत्त्वपूर्ण बाबींचा निर्देश आहे. विसोबा खेचरांचे नाव विसा, विश्वेश्वर, ईश्वर अशा पर्यायांनी आलेले असून, त्यांना 'आचार्य' असे विशेषण लावले आहे. 'कृष्णकुमरु विश्वेश्वरु' या त्यांच्या नामोल्लेखात 'कृष्णकुमर' हे जे विशेषण आहे, ते 'षट्स्थला'तल्या नामोल्लेखाशी पूर्णतः संवादी असून, त्यातून त्यांच्या गुरूचे 'कृष्ण' (= कृष्णनाथ) हे नाव सूचित झाले आहे. विसोबांना 'शिवब्राह्मण' म्हटले असल्यामुळे पांचाळांचा ब्राह्मण्यावरील दावा पुरातन असल्याचे स्पष्ट होत आहे. विशेष म्हणजे विसोबांचे परमगुरू जे चांगदेव यांना वटेश्वराचे वरदान कोणत्या स्थानी लाभले, ते अगदी निःशंक शब्दांत नोंदले आहे.

'षट्स्थला'तही या स्थानाचा निर्देश आहे; परंतु त्यातील तपशील अपुरा असल्यामुळे प्रबंधसिद्धीच्या काळात मला ते स्थान महाराष्ट्राच्या नकाशात नेमके निश्चित करता आले नाही आणि त्या वेळी मी केलेली अनुमाने चुकीची होती, हे उपरिनिर्दिष्ट निर्देशाच्या उपलब्धीनंतर माझ्या ध्यानी आले. ('चक्रपाणि', पृ. १४०-१४१). 'षट्स्थला'तील स्थाननिर्देश असा आहे :

कर वैराट देसिं। चांगयें भक्ति केलि ऐसि।
मग वटेश्वरु तयासि। प्रसन्न जाले।।६६८।।

या स्थाननिर्देशात 'कर वैराट देसिं' असे जरी म्हटले असले, तरी त्या करवैराट देशात नेमक्या कोणत्या गावी चांगदेवांनी वटेश्वराची उपासना केली, याचा तपशील नाही. परंतु आता आपल्यापुढे असलेल्या उताऱ्यात 'करीविराट' देशातील कृष्णगंगा नदीच्या तीरावर वाटेगाव नामक क्षेत्रात उंचवट्याच्या जागी चांगदेव वटेश्वराच्या आराधनेसाठी राहिले होते, असे स्पष्ट शब्दांत सांगितले आहे. या स्थानी चांगदेवांच्या भक्तीमुळे 'पंचब्रह्मा'चे अधिष्ठान असलेला वटेश्वर प्रकट झाला आणि त्याने चांगदेवांना आलिंगन देऊन त्यांच्या शिरावर कृपाकर ठेवला. शिवाच्या कृपास्पर्शाने भारलेल्या चांगदेवांना या स्थानी गुरुदीक्षेचा आचार कसा असतो, शिवयोग म्हणजे काय आणि शिवयोगाच्या साधनेतून शिवैक्य प्राप्त कसे होते, याचा बोध घडला. या दिव्य वरदानामुळे चांगदेव कृतार्थ झाले.

या ग्रंथगत उल्लेखाची खात्री प्रत्यक्ष पहाणीतून करून घेण्यासाठी मी श्रीविठ्ठलविषयक शोधप्रकल्पाच्या काळात (१९८४ पूर्वी) पंढरपूरहून परतताना माझे स्नेही श्री. गजानन केशव जोशी (नाना जोशी) यांच्या समवेत मुद्दाम वाटेगावची शोधयात्रा केली. मुंबई-बंगलोर महामार्गावर कऱ्हाडच्या पुढे असलेल्या कासेगावपासून डाव्या हाताला अवघ्या दहा किलोमीटर अंतरावर वाटेगाव आहे. सांगली जिल्ह्यातील वाळवा तालुक्यात असलेले हे

गाव वरील उताऱ्यात वर्णिल्याप्रमाणे कृष्णेच्या पश्चिमेकडेच आहे. ग्रामस्थांना गावाशेजारच्या नदीचे नाव निश्चित सांगता येत नाही. कुणी तिला गंगा (= नदी) म्हणतात, तर कुणी 'भोगावती' (= गंगा) म्हणतात. आपल्यापुढे असलेल्या उताऱ्यात तिचे नाव 'कृष्णगंगा' असे आहे. या नदीला मोठा घाट जिथे आहे, तिथेच तीरावरच्या उंच भागी 'वाटेश्वरा' चे मोठे मंदिर आहे. चांगदेवांनी 'वाटीचा ईश्वर' पूजेसाठी केला, म्हणून येथील शिवलिंगाला 'वाटेश्वर' असे नाव प्राप्त झाले, ही चांगदेवक्षेत्रातल्या कथेसारखी नामस्पष्टीकरणाची कथा येथेही सांगितली जाते. या वाटेश्वरामुळेच गावाला वाटेगाव असे नाव आहे. येथे मृगनक्षत्रावर शिवपार्वतीविवाहाचा सोहळा होतो आणि कोजागरी पौर्णिमेला मोठी यात्रा भरते. या मंदिरात गर्भगृहाच्या दर्शनी भिंतीजवळ एक आणि प्राकारातही मंदिराच्या भिंतीला बाहेरून टेकवलेली अशा दोन योगी चांगदेवांच्या जुन्या मूर्ती आहेत. ज्ञानदेवादि भावंडे भिंतीवर बसलेली आहेत, अशी एक अगदी उत्तरकालीन मूर्तीही गाभाऱ्याबाहेर दर्शनी भिंतीजवळ ठेवलेली आहे. ज्ञानदेव भिंत चालवून चांगदेवांना सामोरे गेले, या बहुप्रचलित कथेचे हे मूर्तिरूप आहे. येथील वाटेश्वर (वटेश्वर) शिवाची पूजा गुरवांकडे आहे. खानदेशातील तापीतीरावरील चांगदेवक्षेत्र, कऱ्हेच्या काठचे सासवडातील वटेश्वर मंदिर, हरिश्चंद्रगडावरील 'तत्त्वसार' ग्रंथाचे रचनास्थान, पुरंदरगडाच्या पायथ्याशी असलेले नारायणेश्वर मंदिर आणि हे सांगली जिल्ह्यातील वाटेगावचे वटेश्वर मंदिर या सर्व स्थानांचे चांगदेवचरित्रात लक्षणीय स्थान आहे.

*

# परिशिष्ट : सात

## योगिनी मुक्ताबाईची परंपरा



संत नामदेवांचे सद्गुरू
विसोबा खेचर यांचा 'षट्स्थल' हा ग्रंथ म्हणजे
प्राचीन मराठी वाङ्मयातील एक अपूर्व उपलब्धी आहे.
या ग्रंथातील आशय-विषयामुळे
ज्ञानदेवकालीन महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासातील
अज्ञाताचा प्रदेश उजळण्यासाठी
एक प्रखर प्रकाशाचा दीप आपल्या हाती आला आहे.
गोरक्षनाथांची शिष्या महायोगिनी मुक्ताबाई
हिच्या बोधपरंपरेतील या सत्पुरुषाने
त्या अज्ञात योगिनीचे गूढ चरित्र तर प्रकाशित केलेच आहे;
परंतु अप्रत्यक्षपणे आपले परमगुरू चांगा वटेश्वर
यांचें चरित्र नि विचारविश्व उकलण्याचीही
दिशा स्पष्ट केली आहे.
पांचाळ समाजात जन्म घेतलेले आणि
नाथ संप्रदायात दीक्षित झालेले विसोबा खेचर
या ग्रंथातून वीरशैव विचारांचा पहिला प्रभावी आविष्कार
मराठीत घडवीत आहेत,
हीहि या ग्रंथाची एक अपूर्वाई आहे.
जन्मतः लाभलेल्या आपल्या शिल्पजीवी परंपरेतील
विचारांच्या वारशाचा नाथ - वीरशैवांच्या विचारधारांशी
सुरम्य संगम साधणारे विसोबा खेचर
हे महाराष्ट्राच्या समन्वयशील संस्कृतीचे
एक थोर शिल्पकार आहेत, असा आगळा अनुभव घडवणारे
हे **'षट्स्थला'** चे साक्षेपी संपादन आहे.